# आभार



१९२५ ते १९२९ या खांडेकरांच्या कथालेखनाच्या आरंभाच्या काळांत त्यांना लोकप्रियता मिळवून देणाऱ्या 'आंधळ्याची भाऊबीज,' 'सवतीचा सूड,' 'स्वराज्यभिक्षा,' 'गीतारहस्य' वगैरे गोष्टी पुस्तकरूपानें प्रसिद्ध व्हाव्या असें माझ्याप्रमाणेंच अनेक वाचकांनाहि वाटत होतें. जुनें तें सोनें नसतें खरें, पण याचा अर्थ सारेंच जुनें पितळ असतें असाहि होत नाहीं. लेखनाच्या आरंभीं काव्यात्मक रम्यतेचा पगडा लेखकाच्या मनावर अधिक असतो तें या गोष्टींवरून जसें दिसून येईल, त्याप्रमाणें लेखक कितीहि विकासशील असला तरी त्याचें वैशिष्ट्यहि पहिल्या पासून प्रगट होत असतें हेंहि कळून येईल. 'चतुर्भुज' व 'गीतारहस्य' या गोष्टींतला मजेदार उपरोध, 'सवतीचा सूड' आणि 'आंधळ्याची भाऊबीज' यांतील कारुण्याच्या पार्श्वभूमीवर रेखाटलेलीं समाजचित्र, 'आई! आई!!' आणि 'स्वराज्यभिक्षा' यांतील अद्‌भुतरम्यता या गोष्टी खांडेकरांच्या हल्लींच्या वाचकांनाहि कांहीं अपरिचित नाहींत. चांदणें पौर्णिमेकडील नसलें तरी त्याची रम्यता कांहीं कमी होत नाहीं, हें रसिकांना सांगायला नको.

श्रीयुत खांडेकर यांजबरोबर आठ वर्षे शिक्षकाचें काम केल्यामुळें ते माझे सहकारी बंधु होतात. त्यामुळेंच, अलीकडे त्यांचा एक कथासंग्रह प्रसिद्ध झाला असतांनासुद्धां माझ्या विनंतीस मान देऊन आणि माझ्या आवडीप्रमाणें कथांची निवड करून हा संग्रह प्रकाशित करण्याची त्यांनीं मला परवानगी दिली.

माझ्या ह्या प्रकाशनाच्या प्रयत्नास जरूर तें आर्थिक साहाय्य करून प्रोत्साहन दिल्याबद्दल श्री. वासुदेव भिकाजी सामंत, सॉलिसिटर मुंबई व श्री. नारायण विठ्ठल वालावलकर, वांद्रें, यांचे आभार मानावे तेवढे थोडेच होतील. तसेंच माझे विद्यार्थी मित्र भा. रा. राजाध्यक्ष यांनीं मुखपृष्ठावरील चित्र काढून दिल्याबद्दल त्यांचे आभार शब्दातीत आहेत.

रामकृष्ण प्रिन्टिंग प्रेसचे मालक श्री. कृ. ना. सापळे व त्यांचे सहकारी यां शक्य तितक्या त्वरेनें पुस्तक छापून दिल्याबद्दल त्यांचा मीं आभारी आहें. श्री. वा. रा. ढवळे, बी. ए. सहसंपादक 'ज्योत्स्ना,' यांनीं वेळांत वेळ काढून मुद्रितें तपासून देऊन मला उपकृत केलें आहे.

या सर्व मंडळीप्रमाणें रसिकांकडूनहि सक्रिय साहाय्य मिळाल्यास पुढील प्रकाशन करण्याला मला हुरूप येईल हें लिहिलेंच पाहिजे असें नाहीं.

माहीम–मुंबई<br>ता. १ मार्च १९३७ } प्रकाशक

## पुनर्भेट

रसिक वाचकवर्ग वा शिक्षणसंस्था यांच्या खांडेकरांच्या कथांवरील प्रेमामुळें या पुस्तकाला पुनरावृत्तीचा योग लाभला आहे, त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच होतील.

माहीम–मुंबई<br>ता. १ मे १९४० } प्रकाशक

# कथालेखक खांडेकर

"१९२० च्या पुढें लघुकथासंबंधीं आधुनिक दृष्टि येऊं लागली. पाश्चात्य वाङ्मयाचा वाढता परिचय हेंहि याचें कारण असूं शकेल. नियतकालिकांची वाढ झाल्यामुळें लघुकथांची निपजहि फार मोठ्या प्रमाणांत होऊं लागली आहे. रचना आणि विषय यांचें वैचित्र्य दिसून येत आहे. सर्व बाजूंनीं या वाङ्मयप्रकाराचें वैभव वाढत आहे असें दिसून येईल; आणि लघुकथा लिहिणारांची संख्या भूमिति-श्रेणीनें चढत आहे.

या नवीन युगास खांडेकर-युग असें नांव देण्यास हरकत नाहीं. अल्प काळांत खांडेकर यांनीं केलेली वाङ्मयाची सेवा आश्चर्योत्पादक आहे. परंतु त्यांच्या इतर लेखनाच्या मानानें त्यांचें लघुकथा लेखन अधिक चिरस्थायी स्वरूपाचें आहे. संख्या व गुण या दोन्हीं दृष्टींनीं त्यांचें लेखन इतर कोणत्याहि लेखकाच्या मानानें श्रेष्ठ दर्जाचें ठरतें. 'नवमल्लिका,' 'दत्तक व इतर गोष्टी,' 'ऊनपाऊस,' 'जीवनकला,' इत्यादि लघुकथांचे संग्रह त्यांनीं प्रसिद्ध केले आहेत. उपमा, कोट्या, श्लेष, उत्प्रेक्षा इत्यादिअलंकारांची सढळ हातानें खैरात करून त्यांनीं आपल्या भाषासुंदरीला नटविली आहे. कलापूर्ण लेखनाकडे त्यांचें विशेष लक्ष आहे. लघुकथांचा आरंभ आणि शेवट, रचना, नामाभिधान इत्यादि अंगोपांगांकडेसुद्धां त्यांनीं लक्ष पुरविलें आहे. नावीन्यपूर्ण रचना हा त्यांचा विशेष आहे; आणि या गुणामुळेंच अलीकडील लघुकथालेखकांत ते शिरोभागीं झळकतात."

[पृ. ३३२-३३३ प्रो. कृ. पां. कुळकर्णी, एम्. ए. बी. टी. व प्रो. श्री. रा. पारसनीस, एम्. ए. कृत 'अर्वाचीन मराठी' (दुसरी आवृत्ति)]

खांडेकर-वाङ्मय

# प्र का शि त

## लघुनिबंध

वायुलहरी ( दुसरी आवृत्ति )
चांदण्यांत
सायंकाल

## लघुकथा

नवमल्लिका
दत्तक व इतर गोष्टी
जीवनकला
ऊनपाऊस
दंवबिन्दु
विद्युत्प्रकाश
नवचन्द्रिका ( दुसरी आवृत्ति )
पूजन
अबोली
फुलें आणि दगड
पाकळ्या ( दुसरी आवृत्ति )
नवा प्रात:काल
समाधीवरलीं फुलें
पहिली लाट

## कादंबऱ्या

हृदयाची हांक
कांचनमृग ( दुसरी आवृत्ति )
दोन ध्रुव ,, ,,
उल्का ,, ,,
हिरवा चांफा ,, ,,
दोन मनें
रिकामा देव्हारा
पांढरे ढग
सुखाचा शोध

## बोलपट

छाया देवता
ज्वाला सुखाचा शोध

## इतर

रंकाचें राज्य ( नाटक )
वनभोजन ( टीका )
धुंधुर्मास ( ,, )
गडकरी ( ,, )
आगरकर ( चरित्र )
[ दुसरी आवृत्ति लवकरच प्रसिद्ध होईल ]

## अनुक्रम


| | प्रकाशन स्थळ | पृष्ठ |
|---|---|---|
| आई ! आई ! ! | स्वयंसेवक | १ |
| सवतीचा सूड | रत्नाकर | २२ |
| दृष्टिलाभ | प्रगति | ३१ |
| चतुर्भुज | ,, | ४३ |
| माहेरचीं भुतें | यशवंत | ५३ |
| स्वराज्यभिक्षा | रत्नाकर | ६४ |
| आंधळ्याची भाऊबीज | ,, | ८१ |
| लीलावती | ,, | ९५ |
| गीतारहस्य | ,, | १०१ |

# आई ! आई !!

महालाच्या खिडकींत राणी कुसुमावती सूर्यनारायणाच्या दर्शनाला उत्सुक होऊन बसली होती. पूर्वेच्या मुखावर क्षणोक्षणीं येणाऱ्या गुलाबी छटा पाहून मैत्रिणींच्या ' इतकें कांहीं अधीर व्हायला नको, लवकरच मांडीवर मूल खेळूं लागेल हं ' या विनोदी भाषणानें ती लाजत आहे अशी कल्पना राणीच्या मनांत येऊन गेली. बागेंत फुलांवर व पानांवर पडलेल्या दंवाकडे दृष्टि जातांच पूर्वदिशेला—आमच्या राणीला—पुत्ररत्न होणार म्हणून लतिका आनंदाश्रु ढाळीत आहेत असें तिला वाटलें. ती स्वतःशींच हंसली व म्हणाली, "सुखाच्या लाभापेक्षां त्याची कल्पनाच जास्ती आनंद देते. पूर्व दिशेला पुत्ररत्न होणार म्हणून पुष्पसृष्टीच्या डोळ्यांत उभे राहणारे हे आनंदाश्रु सूर्याचें दर्शन झाल्यावर सुकूनच जातात !"

मंचकावर राजेसाहेब या कुशीवरून त्या कुशीवर वळले. पुष्पपुरीचें राज्य लहानच होतें. पण राजेसाहेबांना आपण सूर्यवंशी आहों असा मोठा अभिमान असे. सूर्यवंशांतला अत्यंत श्रेष्ठ राजा जो प्रभु रामचंद्र त्याच्या तोडीचे आपण आहों हें सिद्ध करण्याची ते नेहमीं खटपट करीत असत. रामानें बापाच्या वचनाकरितां वनवास पत्करिला होता; पण वडिलांची परवानगी न घेतांच राजेसाहेब लहानपणीं अरण्यांत जात असत ! उलटून गेलेल्या पन्नाशीपैकीं चवदापेक्षां अधिक वर्षें शिकारीच्या निमित्तानें त्यांनीं रानावनांत काढलीं होतीं. शिवाय त्यांच्या प्रजेला राजेसाहेबांच्या कानांवर गाऱ्हाणीं घालणें म्हणजे अरण्यरोदन होय असा नेहमीं अनुभव येत असे ! राजेसाहेबांनीं वनवास स्वीकारला होता असें कबूल केल्याखेरीज या अरण्यरोदनाची व्युत्पत्ति बरोबर कशी लावतां येणार ?

जागें होणें म्हणजे एक प्रकारचा पुनर्जन्मच होय ! मंचकावर राजेसाहेबांचा हा पुनर्जन्म झाला होता. या पुनर्जन्मांतील बाललीलांना—हातपाय हलविणें, या

कुशीचें त्या कुशीवर होणें, वरच्या छताकडे टक लावून पहाणें वगैरे–त्यांनीं जोरानें सुरवात केली होती. कुसुमावती लगबगीनें मंचकाकडे गेली व लडिवाळपणानें म्हणाली, " सूर्योदयाची शोभा पहायला उठायचं गडे ! "

" काय पाहण्यासारखं आहे एवढें त्यांत ? सूर्यकिरणांनीं उमलणाऱ्या कळ्यांपेक्षां तुझ्या हस्तस्पर्शानें एकदम प्रफुल्लित होणारीं भेंडाचीं फुलेंच मला जास्ती आवडतात. आत्मस्तुतिदेखील नाहीं ना आवडत यावेळीं ? नाहींच आवडायची ! सूर्योदय बघण्याच्या घाईपुढं दुसरं कांहीं आवडायचेंच नाहीं तुला ! तुम्ही बायका नेहमींच अगदीं अधिऱ्या ! लग्नाच्या वेळीं अंतरपाट केव्हां दूर होतो नि तिकडची स्वारी केव्हां दृष्टीला पडते असं तुम्हांला होऊन जातें. ही तुमची लगीनघाई पुरुषांच्या दोन हातांचे चार हात करूनच थांबत नाहीं. सहा, आठ दहा, बारा,—"

कुसुमावतीनें लाजेनें मान खालीं घातली.

राजेसाहेब हंसत हंसत म्हणाले,

" बरें बोवा; तुझ्यापेक्षां मीच पुत्रदर्शनाला अधिक हपापलों आहें. मग तर झालें ? "

" म्हणून तर पदरच्या मानकऱ्यांच्या दिवस झालेल्या बायका माझ्या सोबतीला आणून ठेवल्या आहेत ? "

" वाः, त्यांना मुलगे झाले म्हणून ते माझ्या मांडीवर थोडेच खेळणार आहेत ! श्रीमंतांच्या लग्नाबरोबर इतरांचीं जशीं लग्नं करण्याची चाल आहे—"

" त्याप्रमाणें बाळंतपणावरोबर इतरांचीं बाळंतपणंहि करण्याची नवी चाल पाडायची आहे वाटतं ? "

कुसुमावतीचें बोलणें संपतें न संपतें तोंच पुरोहित नेहमींप्रमाणें आशीर्वाद देण्या-करतां महालांत आले.

" गुरुजी, वेळ पाहून प्रश्न सांगा हं एक ! "

" वेळ पाहून प्रश्न सांगण्याचा माझा हातखंडा आहे; आपल्या वडिलांच्यावेळीं–"

" तें जाऊं दे; राणीसाहेब आम्हांला बक्षीस देणार आहेत. कोणतें तें नक्की सांगा–"

राजेसाहेबांचें मनोगत पूर्णपणें माहीत असलेल्या पुरोहितांना वेळ काढण्याचें किंबहुना पहाण्याचेंहि कारण नव्हतेंच ! ते तत्काळ उद्गारले, 'पुत्ररत्न !' राजेसाहेबांनीं आपल्या बोटांतली अंगठी काढून पुरोहितांच्या अंगावर फेंकली. रत्नं रत्नेन संग-च्छते ! पुत्ररत्न हे शब्द ऐकतांच आनंदानें लाजत कुसुमावती खिडकीपाशीं गेली !

बागेंत दंवाचा एक थेंबहि दिसत नव्हता. सूर्याला जन्म देणाऱ्या पूर्वेच्या गालावरील रक्तिमाहि पार नाहींसा झाला होता !

* * * *

पन्नाशीची झुळुक लागली असतांना, राजेसाहेबांनीं कुसुमावतीचें पाणिग्रहण केलें होतें. स्वतःच्या सुखापेक्षां, आपल्या पूर्वजांच्या बेचाळीस पिढ्या नरकांत पडतील, याची त्यांना जास्त काळजी वाटत होती ! कुसुमावतीसारख्या लावण्यसंपन्न कुमारिकेशीं लग्न करून त्यांना स्वर्गसुख मिळालें होतें. एवढेंच नव्हे, तर त्यांच्या पितरांच्या कपाळींचा नरकवास चुकण्याची आशाहि उत्पन्न झाली होती. लग्न झाल्यानंतर कुसुमावतीची मांडी त्यांना नेहमीं ओकी ओकी दिसूं लागली. फुलांवांचून लता, आणि मुलांवांचून विवाहित स्त्री शोभिवंत दिसत नाहीं, हा नेहमींचा अनुभव आहे. आपल्या गादीला लवकर वारस व्हावा म्हणून राजेसाहेबांनीं जंगजंग पछाडलें ! त्यांनीं प्रथम राजवाड्यांतील सांबाच्या पिंडीला रुद्राभिषेक सुरू केला; पण संहारकर्त्या रुद्राची आराधना करून ब्रह्मदेवाला प्रसन्न करणें, हें काशीच्या वाटेला लागून रामेश्वराला पोंचण्याइतकेंच शक्य होतें. बारसें करायला सांपडावें म्हणून त्यांनीं ब्राह्मणभोजनें घातलीं. आपल्या घराण्यांत कुलदीपक पुत्र व्हावा म्हणून प्रत्येक देवाच्या उत्सवांत त्यांनीं किती दारूसामान जाळलें असेल याची गणतीच करतां येत नाहीं ! पण वर्षामागून वर्षें गेलीं तरी पुत्रलाभाचीं चिन्हें दिसेनात ! प्रत्येक वसंतांत झाडांना पालवी येई; पण राजेसाहेबांचा वंशवृक्ष वठलेलाच दिसे ! प्रत्येक पावसाळ्यांत आकाशांत वीज चमकत असे; पण राजवाड्यांत मात्र अंधारच दिसे ! प्रत्येक हिंवाळ्यांत राजेसाहेबांची बाग दहिंवरानें नाहून निघे; पण कुसुमावतीच्या डोळ्यांत आनंदाश्रु मात्र दिसत नसत ! देवहि अंतच बघायला बसला होता ! शेवटीं, आपल्या हातावरल्या रेषांत कितीहि पुत्र असले तरी तो हात खऱ्याखुऱ्या मुलाच्या पाठीवरून फिरविण्याचें भाग्य त्याला लाभत नाहीं अशी त्यांनीं आपल्या मनाशीं खूणगांठ बांधली नाहीं तोंच, कुसुमावतीला कांहीं दिवस गेल्याची बातमी तिच्या दासींकडून त्यांना कळली. गाढ अंधःकारांत वीज चमकली !

कदाचित् मुलगी होईल या भीतीनें मुलगा होण्यासाठीं राजेसाहेबांनीं जारीचीं अनुष्ठानें सुरू केलीं. कुसुमावतीला दिवस गेलेले कळल्यापासून त्यांनीं नित्य महालक्ष्मीचें दर्शन घेण्याचें सोडून आपला मोर्चा महादेवाकडे वळविला ! राणीच्या

महालांत देखील ते दासीपेक्षां हुजऱ्यांनाच हांक मारीत व दासींना हांक मारायची पाळी आलीच तर ‘ चंपा ’ दासीला ‘ चंपक ’ म्हणून संबोधीत.

कुसुमावतीच्या आगेमागें प्रसूत होणाऱ्या पांच सहा मानकऱ्यांच्या बायकांनाहि त्यांनीं राजवाड्यांत आणून ठेवलें. लोकांना व खुद्द राणीलाहि या त्यांच्या विलक्षण औदार्याचा अर्थ मुळींच कळला नाहीं. कुसुमावतीनें तर थट्टेनें ‘ हें का सूतिकागृह आहे ? ’ असेंहि विचारलें. त्यावर हंसून राजांनीं ‘ मुलगा झाला कीं मी हा राजवाडा सूतिकागृहालाच देऊन टाकणार आहें ! बायकांना डोहाळे लागल्यावर पुरुषांना नकोत का लागायला ? ’ असें उत्तर दिलें !

चार दिवसांनीं कुसुमावतीच्या बरोबरच एका सरदाराच्याहि पत्नीच्या पोटांत दुखूं लागलें. कुसुमावती आधीं पहिलटकरीण व त्यांतून राणी ! मग तिच्या पोटांत दुखूं लागल्यावर दासदासींच्या धांवपळीनें राजवाडा हाल्लून गेला यांत नवल तें कसलें ? पण राजेसाहेबांनीं सर्वांना राणीच्या महालांत जाण्याची मनाई केली व आपल्या खास विश्वासांतील दोन सुईणी आंत पाठवून ते महालाबाहेर येरझारा करूं लागले. थोड्याच वेळांत आधीं सरदार स्त्रीची व नंतर राणीसाहेबांची सुखरूप सुटका झाल्याची वार्ता बाहेर आली. दोन्ही सुईणी राजेसाहेबांच्या कानाशीं लागल्या; पण त्यांचे शब्द ऐकतांच आनंदानें नाचूं लागण्याऐवजीं राजेसाहेबांनीं कपाळाला भयंकर आठ्या घातल्या !

बाहेर सुईणी राजेसाहेबांच्या कानाशीं लागत असतांना आंत कुसुमावती, देवानें पाठवून दिलेल्या देणगीकडे अनिमिष नेत्रांनीं पहात होती ! निळ्या आकाशांत पहिली तारका उगवली तेव्हां त्याला जो आनंद झाला असेल, त्याचा अनुभव कुसुमावतीला यावेळीं येत होता. कौसल्येचा राम, यशोदेचा कृष्ण, अश्वपतीची सावित्री व भीमकाची दमयंती हीं सर्व तिला तिच्यापुढें पडलेल्या टीचभर देहांत सामावलेलीं दिसत होतीं. प्राण गेल्यावर मनुष्य मरतो असें म्हणतात तें साफ खोटें असें तिला वाटूं लागलें. तिचा प्राण तिच्यापुढें अस्फुट चलनवलन करीत होता व ती त्याला डोळे भरून पहात होती. ‘ मुलगी ! असेना मुलगी आली तर ! आकाशाच्या पोटीं येऊन मेघ त्याला काळिमा आणतो; पण वीज मात्र कुलदीपक होते ’ ती मनांत म्हणत होती. मोठ्या सायासांनीं देवदानवांनीं समुद्रमंथनांतून काढलेलीं चौदा रत्नें आपल्या समोरच्या रत्नाच्या पासंगालाहि लागणार नाहींत असें तिला वाटलें ! तिच्या हृदयांत आनंदाच्या पर्वतप्राय लाटा उसळत होत्या ! या

आनंदसागरांत पोहत असतांना हर्षातिरेकानेंच कीं काय कुसुमावतीचा डोळा लागला. कदाचित् तो प्रसूतीनंतर राजेसाहेबांनीं मोठ्या प्रेमानें देवविलेल्या औषधाचा परिणामहि असूं शकेल.

दुसरे दिवशीं सृष्टीच्याबरोबर कुसुमावतीनें आपले डोळे उघडले ! सृष्टीच्या पुढें तिच्या नेहमींच्या कळ्या हंसत होत्या; पण कुसुमावती पाहते तों आपल्याजवळ एक तान्हा मुलगा आहे !

कुसुमावतीनें एरवीं त्या मुलाला कौतुकानें जवळ ओढलें असतें; पण एका रात्रींत मुलीचा मुलगा कसा झाला हें न कळल्यामुळें, संतापानें तिनें त्याला दूर लोटलें ! राणीनें जमदग्नीचा अवतार धारण केलेला पाहून सुईण राजेसाहेबांकडे धांवत गेली ! राजेसाहेब येतांच नेहमींची लाजाळू कुसुमावती ओरडून म्हणाली, " कुठं नेऊन टाकलंत माझं बाळ ? कुणी केली ही कसावकरणी ? "

आपला काळवंडणारा चेहरा दुसरीकडे वळवून राजेसाहेब म्हणाले, " वेड तर लागलं नाहीं ना तुला ? तुझा मुलगा तुझ्यापाशींच आहे—"

" माझा हा मुलगा नव्हे ! "

" वायुवियु तर नाहींना झाला तुला ? "

" आपल्याच अंगांत वारं आलं असेल ! "

" सुईणीला विचार हवं तर ! "

" उंदराला मांजर साक्षी ! "

" कांहीं तरीच घेतलं आहेस तूं डोक्यांत ! तुझा माझ्यावरच विश्वास नाहीं तर करणार काय ? हा मुलगा तुझाच ! "

" नाहीं ! नाहीं ! ! नाहीं ! ! ! अगदीं साफ नाहीं. हा माझा मुलगा असता तर खास यावेळीं त्याला पाहून मला पान्हा फुटला असता. हा मुलगा माझा नव्हे हें सांगायला सुईण कशाला पाहिजे ? आईच्या हृदयासारखा साक्षीदारच या जगांत मिळण[illegible]हीं ! "

राजेसाहेबांना काय बोलावें तेंच कळेना ! इतक्यांत कुसुमावतीच्या डोक्यांत एकदम विलक्षण कल्पना आली ! त्या झटक्यासरशीं ती उठली व पलीकडच्या दालनांत गेली. तिथें तिच्याबरोबरच प्रसूत झालेल्या सरदार-स्त्रीपाशीं एक अर्भक आकाशाकडे डोळे लावून पडलें होतें. जणूं काय 'देवा, मी स्त्रीजातींत जन्माला आलें

म्हणून कां तूं आईपासून मला दूर लोटीत आहेस ?' अशी तें देवाची प्रार्थनाच करीत होतें ! कुसुमावतीनें त्या तान्ह्या मुलाची मान दुखवेल याचा विचार न करतां तें उचललें व राजेसाहेबांपुढें येऊन ती म्हणाली, " हें पाहिलंत माझं छकुलं ? गाईला आपलें वांसरूं ओळखायला शिकवावं लागत नाहीं ! "

राजेसाहेब दिङ्मूढ होऊन गेले होते. पण दरम्यान त्यांच्या सहाय्याला येऊन उभे राहिलेल्या पुरोहितांनीं खडा टाकून बघितला. ' बाईसाहेब, मी हात बघून सांगतों हं ही मुलगी तुमची आहे कीं नाहीं तें ?' राणीला हातांतील सोन्याचें कंकण पहावयाला फुटका आरसा कशाला हवा होता ? पण ती क्षणभर स्वस्थ राहिली. पुरोहित त्या चिमण्या जीवाचा बेलाच्या कोंवळ्या तिकट्याप्रमाणें दिसणारा हात पाहून म्हणतात, ' छे:, रत्नाच्या खाणींत कुठं कांच सांपडते का ? ही मुलगी एखाद्या भिकारणीची, फार तर सरदारणीची असेल ! '

' ही मुलगी माझी आहे. पण आईला मुलगी पाहिजे असली तरी तुम्हांला ती नको आहे ' आपल्या हातांतील बाळजीवाला खेळवीत कुसुमावती म्हणाली; " गुरुजी म्हणतात तूं भिकारणीची मुलगी म्हणून !' तूं तर माझी आहेस ! मग मी भिकारीणच झालें ! होय कीं नाहीं ? होय, मी भिकारीणच झालें ! महाराज, ही पहा मी भिकारीण झालें ?" शेवटचें वाक्य बोलतां बोलतां ती राजेसाहेब व पुरोहित या दोघांच्या अंगावरून झटकन् गेली आणि हां हां म्हणतां राजवाड्याबाहेर अदृश्य झाली. राणी व आई या दोन जीवांच्या कात्रींत कुसुमावती सांपडली होती. राणी मेली व आई आपल्या पोटच्या गोळ्यासाठीं जीवाचें रान करीत निघून गेली !

* * * *

आकाशांतून पडणारी वीज मेघांना ज्याप्रमाणें धरून परत आणतां येत नाहीं त्याप्रमाणें राणीलाहि राजेसाहेब परत आणूं शकले नाहींत. हिमालयावरून उतरलेली गंगा पुन्हां तिथें चढली असें कधीं झालें आहे का ?

राजेसाहेबांनीं गांवांत पुत्ररत्न झाल्याबद्दल सकाळीं द्वाही फिरविली होती [illegible]काळीं राणी कैलासवासी झाल्याची वार्ता विद्युद्वेगानें गांवभर पसरली ! सकाळची जिभेवरची साखर विरघळली नाहीं तोंच हें विष लोकांच्यापुढें दत्त म्हणून उभें राहिलें. दुःखाचा कडेलोट झाल्यामुळें राजेसाहेबांनीं तात्काळ अंत्यविधी उरकून घेतल्याचें जाहीर झालें. ' सुखदुःखांची जोडी जगांत कशी आहे ती पहा ' असें म्हणत लोक राणीला

विसरून गेले. राणीच्या मृत्यूमुळें अनेक कवींची मात्र दारुण निराशा झाली ! गादीला वारस झालेला ऐकून त्यांनीं आनंदीआनंदाचीं महाकाव्यें रचावयाला सुरवात केली होती; परंतु त्यांचीं महाकाव्यें संपण्याच्या आधींच राणीची जीवितयात्रा संपली ! कित्येकांनीं आपल्या काव्यांत राणी शतायुषी होणार असें भाकीतहि वर्तविलें होतें; पण त्यांच्या पद्यांची शाई वाळण्यापूर्वीच राणीचीं शंभर वर्षें भरलीं. तथापि तिळगुळाला तिलांजलीचें स्वरूप देणें हा कवींच्या तळहातचा मळ होता !

राणीला आपण मेल्याचें वर्तमान लवकरच कळलें. ‘ मी मेलें असं त्यांनीं उठविलं; पण माझं मूल मेलं असें म्हणायला कांहीं त्यांची जीभ धजली नाहीं ! मला तरी काय हवं ? माझीं दहा वर्षें घेऊन माझ्या सोनुकलीचं आयुष्य जर एका पळानं देव वाढवीत असेल तर मी तीं दहा वर्षं हांसत देईन ! माझं सुख ! माझ्या चिमण्याच्या डोळ्यांपुढं जगांतल्या रत्नांच्या खाणी मातीमोल वाटतील; आणि त्याच्या गालाचा एकच मुका–तेवढा आनंद जगांतल्या सगळ्या गुलाबांच्या राशींत लोळूनहि मिळणार नाहीं ! पण देवानं दहा वर्षं मागितलीं तरी तीं मी आतां देणार नाहीं हो ! माझी बाळ लहानाची मोठी झाली नि एखाद्या भाग्यवान् राजपुत्राच्या संसाराला तिनं उजळा दिला म्हणजे मग—! पण मी आतां भिकारीण झालें नाहीं ? भिकारिणीच्या मुलीचं स्वयंवर थोडंच मांडावयाचं आहे !...नसेना ! देवाच्या घरीं न्याय असेल तर माझ्या बाळेचं लग्न राजकन्येच्या थाटानं होईल नि ती अंबारींत बसून मिरवेल ! ’ हे व अशा प्रकारचे विचार कुसुमावतीच्या डोक्यांत नित्य घोळत असत !

राणीनें राजधानीपासून दूर असलेलें खेडें गांठलें व तिथें तारेचें संगोपन करण्यास सुरवात केली. राणी असतांना देखील ताटावरून पाटावर करण्याचा तिला कंटाळा होता ! भेंडाचीं सुंदर सुंदर फुलें, वेण्या व हार ती नेहमीं करीत असे. पूर्वी वेळ घालविण्यासाठीं ज्या गोष्टी ती करीत असे त्या आतां पोट भरण्यासाठीं तिला कराव्या लागल्या. आपल्या जीवाचें फूल दारिद्र्याच्या उन्हानें सुकूं नये एवढीच तिची इच्छा होती. [illegible] कृत्रिम फुलांनीं आपल्या छोट्या मालकिणीवर नेहमीं छाया ठेवल्यामुळें तिची ही आशा सहज सफल झाली.

आपल्या निर्जीव फुलांची जितकी वाहवा होते तितकीच आपल्या सजीव फुलाची व्हावी ही महत्त्वाकांक्षा मनांत धरून तिनें तारेच्या संगोपनाबरोबरच शिक्षणालाहि सुरवात केली होती. पहांटे पांखरें गाऊं लागण्यापूर्वीच तारा आईनें शिकविलेल्या

भूपाळ्या व स्तोत्रें म्हणत असे! बाराहि महिने गाणारी असली कोकिला त्या खेड्यांतील कोणत्याहि आम्रवृक्षानें कधींहि पाहिली नव्हती. सूर्योदयापूर्वी नदीच्या निर्मल जलांत, त्या जलापेक्षांहि निर्मल अंतःकरणाची तारा स्नान करीत असतांना दिसे. किंबहुना तारा नदींत उतरली कीं, तिच्या लावण्यानें लज्जित होऊन जलक्रीडेकरतां नदींत उतरलेल्या आकाशांतील तारा पळून जात असत. सूर्योदयाबरोबर कुसुमावतीची तारा म्लान न होतां आपलें बुद्धितेज गुरुजींच्या घरीं प्रगट करी! गुरुजींच्या घरीं अहमहमिकेनें भांडणाऱ्या विद्यार्थ्यांचा आपल्या बुद्धिबलानें पराभव करणारी तारा घरीं येतांच ' आई, आई ' करीत कुसुमावतीच्या कुशींत शिरत असे. यामुळें आपल्या उभ्या आयुष्यांतील अंधार तारेच्या दर्शनानें नाहींसा होतो, असें कुसुमावतीला नेहमींच वाटे.

हळू हळू तारा मोठी होत चालली. वयाबरोबर विद्येंतहि तिची गति वाढली. ' तारा म्हणजे लाखांतली मुलगी आहे बरं! राजपुत्र येतील पायांवर लोटांगण घालत तिच्या! कुणा भाग्यवंताची पूर्वपुण्याई उदयाला येते तें पहावें!' असें गांवांतल्या बायका बोलूं लागल्या. कुसुमावतीचें अशा बोलण्याला मृदु हास्य हेंच उत्तर होतें.

चवदा वर्षे कुसुमावतीनें ध्यानीं, मनीं, स्वप्नीं तारेलाच पाहिलें आणि देवापुढें हात जोडून सदासर्वदा तिच्या मंगलाचीच याचना केली. देवदयेनें तारेचें शारीरिक व बौद्धिक सौंदर्य सारखेंच मोहक झालें, हें पाहून तिचे डोळे आनंदानें भरून येत. ' अश्रूंनो, डोळ्यांना इतक्यांतच अंध करूं नका. तारेच्या डोक्यावर पडलेल्या मंगलाक्षता त्यांना पहावयाच्या आहेत' एवढेंच ती अशावेळीं म्हणे!

राजेसाहेबांनीं आपल्या एकुलत्या एक मुलाचा विवाह यंदा करण्याचा निश्चय केला असून त्याकरितां ते मुली पहात आहेत अशी बातमी पाझरत पाझरत त्या खेड्यांत आली! दुसऱ्या दिवशीं शेजारीपाजारी पाहतात तों घरांतलें सामान-सुमान जसेंच्या तसेंच आहे, पण तारा व तारेची आई या दोघींचाहि [illegible] नाहीं! तेरा चवदा वर्षांपूर्वी ती विजेप्रमाणें एकदम त्या खेड्याच्या क्षितिजावर चमकली होती! आज ती एकदम लुप्त झाली! ' कुणी शापभ्रष्ट देवता असेल; शापाची मुदत संपल्यावर ती इथं राहते कशाला?' असा खेड्यानें एकदम निर्णय दिला.

* * *

कठोर दिवसाला टाकून गेलेली रात्र परत येत होती. राजधानीच्या वेशींतच कुसुमावती व तारा यांना एक सरदारसाहेब भेटले. चवदा वर्षांपूर्वी राणीबरोबर त्यांची पत्नी प्रसूत झाली होती. पण निष्ठुर कालानें एका बाळंतिणीवर तर दुसऱ्या बाळावर झडप घातली होती. तेव्हांपासून मूल नसल्यामुळें त्यांची पत्नी नेहमीं खिन्नच असे ! नेहमीं रडून आणि जागून तिनें आपली दृष्टि मंद करून घेतली होती. भजनीं लागायला संसार नसला म्हणजे साधु दिसतो या नियमाला सरदारसाहेब कांहीं अपवाद नव्हते. गांवाबाहेरील एका साधूच्या मठांत संध्याकाळचा वेळ काढून ते आतां घरीं परत जात होते. कुसुमावती व तारा यांचा वेष साधाच होता; पण तारेचें अप्रतिम लावण्य पहातांच त्यांची नजर तिच्यावर खिळून गेली.

" बाई, कुठल्या तुम्हीं ? " त्यांनीं विचारलें.

" आम्ही प्रवासी आहोंत, आम्हाला ना घर ना दार ! "

' मग आमच्या घरीं चलानात ! ' कुसुमावतीनें मान वर करून त्याच्याकडे पाहिलें. त्याच्या निष्पाप चेहऱ्याकडे पाहतांच त्याच्या आकस्मिक आमंत्रणांत कांहीं दगा नाहीं अशी तिची खात्री पटली. राणी व राजकन्या सरदाराबरोबर त्याच्या घरीं गेलीं.

पुष्पपुरी निद्रेच्या पाशांत बद्ध होऊन पडली होती. पण सरदारसाहेबांच्या महालाला अजून निजायची वेळ झाली होती हें माहीतच नव्हतें ! पोरवयाला अनुसरून तारा त्यांच्या महालासमोरच्या खोलींत केव्हांच झोंपी गेली होती. महालांत कुसुमावती, सरदार व सरदारांची पत्नी हें त्रिकूट बोलत बसलें होतें.

" महाराज, माझा सगळा जीव या पोरीवर आहे. तिच्यासाठींच मी जगलें आहें–" कुसुमावती म्हणाली.

" हें खरें ना ? कां आपलं बोलायचं म्हणून बोलतां ? "

" माझ्या तारेसाठीं मी कोणतेंहि दिव्य करीन—"

" मग माझं म्हणणं कबूल कराल तर तुमची मुलगी जन्माची सुखी होईल. तुम्ही आपली मुलगी उद्यां राजेसाहेबांकडे घेऊन गेलांत तर शिपायाचे चार धक्के मात्र मिळतील–रागावूं नका हं ! जगांत गुणापेक्षां धनाला नि विद्येपेक्षां सत्तेला मान असतो म्हणून बोललों ! "

" छेः राग कसला त्यांत ? तारेच्या कल्याणाकरितां माझ्या हृदयाच रक्त हवं असलं तर तें देखील मी हांसत देईन. बरं, तारेला तुमच्या पदरांत टाकली तर काय कराल ? "

" काय करणार ? माझ्या मेव्हणीची मुलगी म्हणून उद्यां राजेसाहेबांना नेऊन दाखविणार तिला. चार दिवसांत युवराज्ञी होईल ती ! "

" खास ? "

" अगदीं खास ! "

" मग मी तिला तुमच्या पदरांत टाकायला तयार आहें. तुमच्या घरांत मोल-करीण म्हणून राहीन मी. तारेला तुमची भाची माना म्हणजे झालं ! "

" मग हें सगळं बेंड फुटायला काय उशीर ? ती तुम्हांला आई म्हटल्यावांचून थोडीच राहील ? लोखंडाच्याजवळ परिस न्यायच्या वेळीं लोहचुंबक तिथं असतां कामा नये ! "

" मग मी काय करूं ? " डोळ्यांत अश्रु आणून कुसुमावती म्हणाली.

" तुम्ही दुसरीकडे रहा नि तिला केव्हांहि भेटूं नका. "

" उद्यां सकाळीं ' आई कुठं आहे ' म्हणून ती विचारूं लागेल तेव्हां—? "

" काशीयात्रेला गेली सोबत मिळाली म्हणून, असें सांगूं. "

" तिचं दर्शन हेंच माझं अन्न. त्याच्यावांचून मी जगूं तरी कशी ? "

" तुम्ही तिला पहायला आलांत कीं, सगळाच व्यूह ढांसळेल ! "

कुसुमावतीच्या हृदयाचें पाणी पाणी झालें. आज चौदा वर्षें हृदयांत वाढलेली प्रेमलता चांगल्या वृक्षावर चढावी म्हणून तिला तिथून हलविणें प्राप्त होतें. पण या कृत्यानें तिच्या हृदयाच्या चिंधड्या चिंधड्या होणार होत्या. कोणत्या प्रेमसूत्रानें या चिंध्यां ती शिवणार व आपलेपणाची ऊब मिळविणार ? सरदारांच्या पत्नी आतांपर्यंत बोलल्या नव्हत्या ! कुसुमावतीची मनःस्थिति ओळखून त्या म्हणाल्या, " बाई, तुम्ही केव्हां तरी रात्रीं येऊन तारेला पाहून जात जा म्हणजे झालं ! "

सरदार मध्येंच म्हणाले, " पण भिंतीला देखील कान असतात आणि कुत्र्या-पेक्षांहि त्यांना लवकर चाहूल लागते. "

कुसुमावती डोळे पुशीत म्हणाली, " दर अमावास्येला रात्रीं मी येईन. "

" मग तारा कोण व कुठली याचा बोभाटा होण्यापूर्वीच व्यवस्था झालेली बरी ! ' सरदार म्हणाले.

तारा सासरीं जाणार तेव्हां तर कांहीं आपल्याला बरोबर जातां येत नाहीं ! उद्यांचीच गोष्ट आज झाली तर त्याचें दुःख कशाला पाहिजे ? शिवाय आपल्या सामान्य स्थितींत तिच्या गुणांना योग्य असें स्थळ आपण कुठून मिळविणार ? पुत्राच्या लोभानें तिच्या हक्काचें राजपद राजेसाहेबांनीं जन्मतःच तिच्यापासून हिरावून घेतलें होतें. तारा सरदारांची भाची झाल्यास तें परत मिळण्याचा संभव होता. स्वतःच्या सुखासाठीं आपण तारेच्या वैभवाआड येणें पाप नाहीं का होणार ? राणीनें आपल्या मनाची अशी समजूत घातली आणि ती तारेच्या खोलींत गेली.

आपली आई राजवाड्यांत असून आपल्या अंगावर सोन्यामोत्यांचे दागिने घालीत आहे, असें स्वप्न तारेला पडत होतें. कुसुमावती पाऊल न वाजवितां तारेपाशीं गेली व तिनें डोळे पुसून तिचा मुका घेतला. तेवढ्यानें समाधान वाटलें नाहीं म्हणून दुसरा घेतला. तिसरा—चवथा—' ती जागी होईल ' सरदार हळूच म्हणाले. कुसुमावती भानावर आली. जाण्याकरतां तिनें दरवाजाकडे पाऊल वळविलें. पायांत दीड मणाच्या बेड्या घातल्या असत्या तरी पाऊल उचलणें तिला आतांइतकें जड झालें नसतें. तिनें दोन पावलें कशींबशीं टाकली तोंच तारा झोपेंत ' आई ' असें म्हणाली. त्या दोनच शब्दांनीं कुसुमावतीच्या निश्चयाचें पाणीच पाणी झालें. तिनें पुन्हां मागें वळून पाहिलें ' बाळ, लहानपणीं आई गरीब असली तरी चालतं, पण उपवर मुलीची आई गरीब असून भागत नाहीं—' ती मनांतल्यामनांत म्हणाली. तिचे डोळे इतके भरून आले कीं, तिला दरवाजाकडची वाटहि दिसेना.

थोड्याच वेळांत कुसुमावती सरदारांबरोबर एका धर्मशाळेंत आली. सरदार-साहेब निरोप घेऊन परत गेले. डोळ्यांना तारा दिसत नाहीं पण कानांत मात्र ' आई ' ही हांक घुमत आहे अशा स्थितींत तिनें ती रात्र धर्मशाळेंत घालविली.

* * * *

आज महालक्ष्मीच्या देवळांत गुसता तोबा उडाला होता ! राजेसाहेब, युवराज व नवपरिणीत युवराज्ञी यांच्यासह देवीच्या दर्शनाला येणार होते. दिवाळीपेक्षां अधिक दिवे व गुढीपाडव्यापेक्षां अधिक गुढ्या राजवाड्यापासून देवालयापर्यंत जिकडे तिकडे दिसत होत्या ! कुसुमावती दिवंगत झाल्यानंतरचा महोत्सवाचा असा हाच प्रसंग होता. जनसंमर्दापैकीं उतारवयाची मंडळी ' आज राणीसाहेब असत्या

तर दुधांत साखर पडली असती ! ' म्हणून हळहळत होती. तरुण मंडळी ' ह्या सरदाराला बोवा कांहीं तरी भूतपिशाच्च साध्य आहे. नाहींतर राजेसाहेबांशीं याचं सूत जमतं कसं हो ? चवदा पंधरा वर्षांपूर्वीच बाळंतपणासाठीं ह्याच्या बायकोला राणीसाहेबांबरोबर राजवाड्यांत ठेवलें ! आतां पहावें तर कामापुरता मामा होऊन हा भाची आणतो काय आणि राजेसाहेब तिला आपली सून करून घेतात काय ?' अशा गप्पा मोठमोठ्या तावातावानें मारीत होती. महालक्ष्मीच्या डाव्या बाजूला बायकांचा नुसता पाऊस पडत होता. त्यांच्या गप्पागोष्टींत भाग न घेतां वधूवर स्पष्ट दिसतील अशा जागीं खांबाआड एक स्त्री उभी होती. तिच्या अंतःकरणांत काय खळबळ चालली होती ती महालक्ष्मीलाच माहीत.

भालदार–चोपदार ललकारूं लागले. माणसांनीं फुलून गेलेल्या देवळांत दरबारा-प्रमाणें शांतता पसरली. पुढें वधूवर व त्यांच्या मागून राजेसाहेब, सरदार व त्यांची पत्नी अशी मंडळी देवीपुढें आली. त्यांनीं भक्तिभावानें देवीला वंदन केलें.

" सूनबाई, तुझं कांहीं मागणं असेल तर तें देवापाशीं मागून घे. आमच्या महालक्ष्मीच्या मुठींत ब्रह्मा, विष्णु व महेश हे तिन्ही देव आहेत " राजेसाहेब विनोदानें म्हणाले.

" हें काय सांगायला पाहिजे ? " पुरोहित तोंड मध्येंच घालून म्हणाले. " युवराज झाले ते जगदंबेच्या प्रसादानेंच ! " राजेसाहेबांनीं डोळे वटारले; पुरोहितांनीं तोंडाला कुलुप घातलें.

राजस्नुषा ' देवी मला लवकर पुत्रवती कर ' असा नवस करील असा बहुतेकांचा अंदाज होता. पण ' देवा, माझी आई काशीयात्रेला गेली आहे ती लवकर परत येऊं दे. ' हे राजस्नुषेचे शब्द ऐकतांच स्त्रीसमाजांतील अनेक आजीबाईंनीं नाक मुरडलं ! खांबाआड उभ्या राहिलेल्या स्त्रीच्या डोळ्यांतून मात्र गंगायमुना वाहूं लागल्या. कुणीतरी खांबाआडून आपल्याला देवीकडे ओढीत आहे असें तिला वाटलें.

" मुलीची आई नाहीं असें म्हणालां होतां ना सरदारसाहेब ? " राजेसाहेबांनीं सूनबाईचं मागणं ऐकतांच चमकून विचारलें. सरदारसाहेब काय उत्तर द्यावं याचा विचारच करीत होते. प्रसंगावधान राखून ते हळूच म्हणाले, ' आई काशीयात्रेला गेली म्हणून सांगितलं होतं तिला लहानपणीं, तेंच उगाळीत बसली आहे पोर झालं ? " राजस्नुषेनें भक्तिभावानें जगदंबेपुढें हात जोडले. ती रुद्ध कंठानें म्हणाली, ' आई—'

देवालयाच्या गाभाऱ्यांत ' आई ' हा शब्द घुमला. खांबाआडच्या रुद्ध कंठांतून ' तारा ' असे शब्द आले व तेथें उभी असलेली स्त्री धाडकन् भूमीवर पडली ! ' तारा ' हे शब्द कानावर पडतांच ' आई, आई, ' करीत राजस्नुषा तिकडे धांवली. राजेसाहेबहि तिकडे धांवत गेले. पडलेल्या स्त्रीकडे पाहतांच ते दचकून ओरडले,

" कोण कुसुमावती ? सूनबाई, ही कोण तुमची ? "

तारा आनंदानें उद्गारली " आई, ही माझी आई ! "

" तुझी आई ? तुझी आई ? " हे शब्द राजेसाहेबांनीं विलक्षण रीतीनें उच्चारले व ते बेशुद्ध कुसुमावतीच्या पायावर डोकें ठेवून लहान मुलाप्रमाणें ओक्साबोक्शीं रडूं लागले. तारेला राजेसाहेबांच्या रडण्याचें कारण कळेना ! ती आनंदातिशयानें म्हणाली, " ही माझी आई ! आई ! "

देवळाच्या गाभाऱ्यांतून व अफाट जनसमुदायांतून ' आई ! आई ! ! ' हाच प्रतिध्वनि राजेसाहेबांच्या कानांत घुमूं लागला !

१९२५

# सवतीचा सूड

एका मजुराच्या बायकोची सुखरूप सुटका करून सिंधू गाडींतून आपल्या बिऱ्हाडाकडे परत येत होती. सुईण झाल्यापासून तिनें अनेक बाळंतपणें केलीं होतीं, शेंकडों रुपये मिळविले होते; पण आज त्या दरिद्री मजुराच्या बायकोचें, एक पैहि न घेतां, तिनें जें बाळंतपण केलें होतें त्याचा आनंद कांहीं अवर्णनीय होता. उपभोगाच्या मोहरेपेक्षां परोपकाराची पै मनाला अधिक सुख देते, अशी जी म्हण आहे ती तिला आज अनुभवानें पटत होती. तो मजूर बोलवायला आपल्यापासूनचे सर्व प्रसंग तिच्या मनःश्चक्षूंपुढून पुनः पुनः जात होते. ' बाई, तुम्हीच माझ्या आई व्हा ' म्हणून त्यानें डोळ्यांत आंसवें आणून बायकोच्या सुटकेकरितां आपल्या बिऱ्हाडीं येण्याविषयीं कळवळ्यानें केलेली विनंति अजूनहि तिच्या कानांत घुमत होती. मुंबईंत पैसा हाच परमेश्वर आहे; त्याच्यावांचून इथलं पान हलायचं नाहीं. पण हा परमेश्वर आम्हांला पाठमोरा झाला आहे. ' आई, तुम्हीच आमच्या परमेश्वर ' अशा अर्थाचे त्याचे उद्गार अजूनहि तिच्या हृदयाला हलवून सोडीत होते. त्याच्या बायकोची सुटका केल्यानंतर ' आमच्या कातड्याचे जोडे केले तरी तुमचे उपकार फिटणार नाहींत ' हे त्यानें कृतज्ञतापूर्वक काढलेले शब्द तिच्या भाजलेल्या मनाला तेलाच्या घडीप्रमाणें वाटत होते. कृतज्ञतेच्या अश्रूंची किंमत कोहिनूरापेक्षां जास्त असते असें कांहीं तरी बोलावें असें आपल्या मनांत आलें. पण कंठ सद्गदित झाल्यामुळें आपण त्याच्या बायकोच्या पाठीवरून हात फिरविला, तान्ह्या मुलाला कुरवाळलें आणि राणीचें बाळंतपण करूनहि जेवढा आनंद झाला नसता, तेवढ्या आनंदानें घरीं यायला निघालें. व्यवहाराच्या दृष्टीनें एक पैदेखील मिळविली नसतांना हजारों रुपये मिळाल्याचा आनंद आपल्याला होत आहे हें पाहून सिंधूच्या मनांत, सृष्टि प्रेमाची आहे, संसार जिव्हाळ्याचा आहे असे विचार घोळूं लागले.

पण जसजशी ती आपल्या बिऱ्हाडाजवळ येऊं लागली तसतसें हें प्रेमाचें तत्त्वज्ञान तिला पटेनासें झालें. त्या मजुराला माध्यान्हीची भ्रांत असली तरी बायको व मूल यांच्या सहवासामुळें त्याच्या मनांत यावेळीं नंदनवन फुललें आहे आणि आपल्या बँकबुकांत पांच हजार रुपयांची नोंद असली तरी आपल्या हृदयांत स्मशानाची भीषणता वावरत आहे हा विरोध पदोपदीं तिच्या मनांत वर डोकें काढूं लागला. घरीं जातांच काय करायचें ? 'माझी बाळ किती दमली ती' म्हणून प्रेमानें पाठीवर हात फिरविणारी आई नाहीं, गालांतल्या गालांत हंसून पाहणारी स्वारी—

हा विचार मनांत येतांच सिंधूनें आपले ओठ घट्ट चावले. हृदयांत रुतून बसलेलें भाल्याचें टोंक कुणीतरी हलविलें. तिनें चटकन् गाडींतून बाहेर पाहिलें. गाडी एका भव्य दुकानासमोरून जात होती. त्या दुकानांतील उंच आरशांत तिनें आपलें प्रतिबिंब पाहिलें. त्या प्रतिबिंबाच्या कपाळावरील कुंकू पाहून तिला अधिकच चीड आली. झटक्यासरशीं तिनें आपला हात कपाळाकडे नेला. 'कशाला हवा हा कुंकवाचा डाग ?' असा विचार तिच्या मनांत येऊनहि गेला. ज्याच्या नांवानें कुंकूं लावायचें त्यानें आपलें नांव टाकलेलें ! ज्याच्या नांवानें मंगळसूत्र' गळ्यांत धारण केलेलें त्यानें आपल्या संसारसुखाला गळफांस लावलेला ! कशासाठीं, कुणासाठीं: सौभाग्याचीं हीं चिन्हें आपण मिरवीत बसायचें ? सिंधू संतापानें जळत होती; पण कपाळाचें कुंकूं पुसून टाकण्याला मात्र तिचा हात धजला नाहीं. आपल्या मृत संसाराचीं हीं भुतें मनांतून निघून जावींत म्हणून ती गाडीबाहेर पाहूं लागली. प्रथमतःच, तिच्या दृष्टीला एक भाजीवाली पडली. तिच्या डोक्यावर भाजीनें भरलेली एक खूप मोठी पाटी होती. पण त्या पाटीचें ओझें तिला मुळींच वाटत नव्हतें असें दिसलें. कडेवरल्या मुलाकडे पाहण्यांत आणि त्याला खेळवण्यांत ती तल्लीन होऊन गेली होती. 'ही भाजीवाली देखील माझ्यापेक्षां अधिक सुखी नाहीं का ?' सिंधूच्या मनांत विचार आला. पुन्हां त्याच दुःखदायक कल्पनांची वावटळ सुरू झाली. नवऱ्यानें जर आपलें नांव टाकलें नसतें तर आपणहि असेंच मुलाला कडेवर घेऊन काम करीत राहिलों नसतों का ? त्या भाजीवालीच्या अंगावर फाटकें लुगडें आहे व आपण सुंदर रेशमी लुगडें नेसलों आहों; पण तिच्या मुखावरील तें वत्सल हास्य आपल्याला कधींहि मिळण्याचा संभव नाहीं. तिच्या गळ्यांत आपल्यासारखी मोहनमाळ नसली तरी प्रेमानें पडणारा अपत्याचा बाहुपाश आहे. सिंधूचें स्त्रीहृदय या तुलनेनें अगदीं व्याकुळ झालें. 'सुख कशांत आहे ?' या

प्रश्नाचें उत्तर 'मुलाच्या मुक्यांत' असेंच तिनें यावेळीं दिलें असतें. मुंबईतल्या दहा लाख जिवंत दारिद्र्यानें पीडलेले, रोगानें गांजलेले अनेक लोक असतील; पण बँकेंत पांच हजार रुपये असूनहि अहोरात्र तळमळत राहणारा व शरिराचा कोण-ताहि रोग नसून हृद्रोगानें हैराण झालेला त्यांत एकहि जीव नसेल असें तिला वाटूं लागलें.

गाडींतून उतरून जड पावलांनीं ती जिना चढली. तिच्याकरितां दारांत वाट पहात निर्जीव कुलुपाखेरीज दुसरें कोण उभें राहणार होतें? कुलुप काढून ती आंत गेली. उदास दृष्टीनें तिनें खोलींत चोंहोंकडे नजर फिरविली. पतीचे प्रेमळ शब्द अगर बालकाचें वत्सल हास्य कधींच न ऐकलेल्या त्या खोलीच्या भिंती तिचें समाधान करण्याला सर्वस्वीं असमर्थ होत्या. खोलींत टांगलेल्या रविवर्म्यांच्या 'शकुंतलाजन्म' या चित्रावर तिची नजर स्थिर झाली. पुन्हा मघाचे विचार मनांत थैमान घालूं लागले.

'सारे पुरुष विश्वामित्रासारखेच कठोर असतात काय? मी जर मेनका असतें तर शकुंतलेला सोडून स्वर्गांत परत जाण्याचा मोह मला कधींच झाला नसता! देवा, पूर्वजन्मीं मी कोणतें पाप केलें होतें म्हणून या जन्मीं मला ही सवाष्णपणीं वैधव्याची शिक्षा भोगायला लावलीस? माझ्यापेक्षां विधवा अधिक सुखी नाहीं का? तिच्या डोळ्यांना भूतकालचीं चित्रें पाहून समाधान होत असेल. क्षणभर का होईना प्रेमाच्या प्रसंगांची आठवण होऊन तिचें हृदय उचंबळून जात असेल. तिच्या संसाराची वेल वीज पडून जळून गेलेली असली तरी एके काळीं तिच्यावर फुलें फुललेलीं असतात व त्या फुलांचा सुगंध तिच्या हृदयाला उल्हासित करतो. पण माझें आयुष्य म्हणजे फुलें यायच्या आधींच वठून गेलेली वेल नाहीं का?'

सिंधूला विचारांचा भार अगदीं असह्य झाला. ती गच्चीवर गेली. खालून लोकांची धांवपळ चालली होती. त्यांपैकीं प्रत्येक मनुष्य आपल्यापेक्षां अधिक सुखी आहे असें तिला वाटूं लागलें. गच्चीवरून उडी टाकली तर एका क्षणांत हृदयाला डसणारे विचारांचे विंचू नाहींसे होतील असें तिला वाटलें. 'उडीच कशाला टाकायला हवी? इतकीं विषं माहीत आहेत मला' ती स्वतःशींच पुटपुटली. पण जीव देण्याचा विचार तिच्या मनांत फार वेळ राहिला नाहीं. सुखाचा लवलेश नसतांना, तें मिळण्याची तिळमात्र आशा नसतांना आपणाला जगावेसें कां वाटतें हें तिचें तिलाच कळेना. कदाचित् आपल्या जन्माचें नुकसान करणाऱ्या नवऱ्याचा सूड घेण्याची इच्छा

या जगण्याच्या इच्छेच्या मुळाशीं असावी असा अंधुक संशय तिला आला. आपल्या जन्माचा सत्यनाश करून तो तिकडे दुसऱ्या बायकोबरोबर सुखानें संसार करीत आहे, हें चित्र तिचें अंतःकरण विदीर्ण करून टाकीत होतें. एका पुरुषानें दुसऱ्या पुरुषाच्या जन्माचें असें नुकसान केलें तर तो सूड घेतल्यावांचून रहाणार नाहीं असें तिचें मन तिला सांगत होतें. आपल्याला त्रास देणाऱ्या माणसाचें सुख मनुष्याच्या मनांत नेहमीं खुपत असतें. सिंधूचीहि स्थिति आतां तशीच झाली होती. ' नवऱ्याचा सूड ! केवढें पाप हें ! आर्यस्त्रीला असले विचार शोभत देखील नाहींत ' असें संस्कारांच्या चाकोरींतून जाणारें मन तिला सांगूं लागतांच, स्वतंत्र वृत्तीच्या मनानें उसळी मारली व त्या उसळीसरशीं आपली ट्रंक उघडून तिनें एक पत्र काढलें. त्या पत्रानेंच तिच्या आयुष्याचें मातेरें केलें होतें. त्या पत्रानें प्रत्येक वाचनाच्या वेळीं तिच्या हृदयाचे लचके तोडले होते; पण मद्याप्रमाणें दुःखाच्या घुटक्यांचाहि मोह अनावर होत असल्यामुळें, ती तें पुन्हा वाचूं लागली.

* * * *

श्री. बेळगांव

२७–१०–२०

कृ. शि. सा. न. वि. वि.

( वास्तविक आपल्यासारख्यांना लिहावयाचा मायना म्हणजे ' दुरून नमस्कार ' असाच असावयाला पाहिजे; पण आम्ही तुमच्यासारखे सुधारक नसल्यामुळें वाडवडिलांची चाल आम्हांला सोडतां येत नाहीं. ) यंदां आपले वडील ऊर्फ आमचे श्वशुर वारल्यामुळें आपणांला दिवाळसण करतां येत नाहीं हें आपल्या पत्रावरून कळलें. दिवाळसणाचा खर्च वांचविण्यासाठींच आपल्या वडिलांनी ही मरण्याची युक्ति काढली असावी असें आम्हांस वाटतें. असो. ' गतं न शोच्येत ' असें शास्त्रवचन असल्यामुळें प्रस्तुताकडे वळतों.

लग्नाच्या वेळीं आपल्या वडिलांनीं आम्हांला तीन हजार रुपये द्यावयाचे कबूल केलें होतें. पण त्यांपैकीं आमच्या हातांत रोख दोन हजारच पडले. सासरेपणाचें नातें असल्यामुळें आम्हांला प्रॉमिसरी नोटहि करून घेतां आली नाहीं. आपल्या बहिणीला लग्नानंतर पुन्हा आम्ही घरीं आणली नाहीं, याचें

कारण पैशाच्या बाबतींत झालेली आमची फसवणूकच होय. मागील पत्रांत वडिलांच्या मृत्यूमुळें ' येणें बुडालें व देणें मात्र द्यावें लागत आहे ' असें आपण लिहिलें होतें. त्या देण्यांतील आमचे हजार रुपये एक महिन्याच्या आंत आपण चुकते करावेत. या बाबतींत हयगय झाल्यास मार्गशीर्षांत आपल्या बहिणीला घेऊन माझ्या लग्नाला यावें लागेल हें विसरूं नये. पहिली बायको असल्यामुळें मला कुणी मुलगी देणार नाहीं असा भ्रम आपल्याला होण्याचा संभव आहे; पण पहिली बायको वाईट चालीची होती असा पुकारा करणें आमच्या हातांत आहे, हें आपण विसरूं नका. प्रेमाबिमाच्या तुमच्या गप्पा आम्हांला समजत नाहींत. आम्ही पडलों व्यापारीभाई ! दाम रोख नि माल चोख हें आमचें मुख्य तत्त्व. आपल्या बहिणीच्या आयुष्याची रांखरांगोळी होऊं नये अशी इच्छा असल्यास लंगड्या सबबी पुढें करूं नयेत. कळावें, लोभ असावा हे विनंति. आपला,

**भा. वि. दांडेकर**

गेल्या सहा वर्षांत सिंधूनें हें पत्र किती तरी वेळां वाचलें होतें. पत्र जुनें झालें होतें; पण तिचें दुःख अद्यापि नवेंच होतें. शरीराच्या जखमा कालांतरानें भरून येतात, हृदयाची जखम मात्र कुडींत प्राण असेपर्यंत जशीच्या तशीच राहते. " केवळ एक हजारासाठीं नवऱ्यानें आपल्याला टाकावी ना ? ' धर्मेच, अर्थेच, कामेच, नातिचरामि ' अशी देवा--ब्राह्मणांसमक्ष शपथ घेऊन ज्या हातानें आपलें पाणिग्रहण केलें त्याच हातानें असलें भयंकर पत्र लिहावें ना ? एका मुलीच्या जन्माच्या सुखा-पेक्षां एक हजार रुपयांची किंमत जगाला जास्त वाटावी काय ? आपल्यासाठीं जर त्यांनीं हजार रुपयांची सूट दिली असती, पैशांपेक्षां बायकोची किंमत जर त्यांनीं अधिक मानली असती तर आज त्यांची पायधूळ मस्तकीं धारण करण्यांत आपल्याला धन्यता वाटली असती. पण आतां त्यांचें मुखावलोकनहि नको. बरं, बायको टाकायची तर टाकायची होती; पण तिच्या कपाळावर वाईट चालीचें खापर फोडण्याचा दुष्टपणा त्यांनीं कां करावा ? वाटेल त्यानें जीभ उचलावी, टाळ्याला लावावी नि कुठल्याहि स्त्रीला वाईट चालीची म्हणावें. देवा, बायकांच्या जातीनें तुझें असें काय घोडें मारलें होतें म्हणून असले अन्याय तूं तिला निमूटपणें सोसायला लावतोस ? नाहीं, मी कधींहि नाहीं हें सहन करणार. या अन्यायाचा सूड उगवीन तरच मी नांवाची सिंधू."

दारावरली घंटा जर यावेळीं वाजली नसती तर सिंधूच्या मनांतील ही खळबळ किती वाढली असती हें सांगवत नाहीं. ती दार उघडून पाहते तों आठदहा दिवसांपूर्वी तिला भेटून गेलेले मुंबईचे प्रसिद्ध व्यापारी सोनवा सहस्त्रबुद्धे दारांत उभे. आपली एक दूरची मामेबहीण का मावसबहीण पहिल्याच बाळंतपणासाठीं आपल्याकडे येणार आहे असें आठ दहा दिवसांपूर्वीच ते सांगून गेले असल्यामुळें, ते कां आले आहेत हें सिंधूनें तात्काळ ताडलें. मजूर व लक्षाधीश व्यापारी या दोघांच्याहि घरीं एकाच दिवशीं बाळंतपणासाठीं जाण्याच्या योगायोगाचें कौतुक करीत ती सहस्त्रबुध्यांच्यावरोबर त्यांच्या घरीं गेली.

* * * *

" सिंधूताई, तुम्ही मला प्राणदान दिलेंत. तुमचे हे उपकार जन्मोजन्मीं फिटणार नाहींत. सोनू दादा सांगत होते कीं, अहोरात्र तुम्ही माझ्या उशाशीं बसून होतां. आईदेखील पोटच्या पोरांची अशी शुश्रूषा करणार नाहीं " इंदू सिंधूचा हात लाडकेपणानें आपल्या हातांत घेऊन म्हणाली. सिंधूला गहिंवर आला. इंदूची सुटका सुखरूप झाली खरी; पण तेव्हांपासून तिच्या अंगांत जो ताप भरला तो एकसारखा दहा बारा दिवस होता. या तिच्या आजारांत सिंधू जेवण्याकरितां म्हणून देखील तिला सोडून खोलीबाहेर गेली नव्हती. ती वात्सल्यानें भरलेल्या स्वरानें म्हणाली, " इंदूताई, यांत विशेष असं मी काय केलं ? पोटासाठीं मनुष्य नाहीं नाहीं तीं सोंगं करतो; त्यांतलं सुईणीचं सोंग मी घेतलं आहे झालं ! "

" पोटासाठीं ! सिंधूताई पोटासाठीं मनुष्य तोंडपुजेपणा करील; पण त्याचं आंतडं तुटणार नाहीं. नेमलेलं काम म्हणून रोग्याच्या मानेखालीं हात घालून त्याला कुणीहि उठवील; पण तो हात लांकडाच्या फळीसारखाच असणार. तुमच्या हातासारखा फुलांचा नाजुकपणा आणि आईची माया त्याच्यांत कुठून आढळून येणार ?"

" पुरे, पुरे बरं इंदूताई. तुम्ही किनई चांगल्या बऱ्या झालां म्हणजे तुमचं एक व्याख्यान करवूं मुंबईत. साखरेप्रमाणं स्तुतिदेखील मर्यादेंत असली म्हणजेच गोड लागते हं. "

" आपण उपकार मात्र अमर्याद करावेत आणि आम्ही स्तुति मात्र मर्यादित करावी. बरा आहे बाई हा न्याय ! देव फुलाच्या पाकळीवर संतुष्ट होत असला म्हणून भक्तानं त्याला फुलांचा लक्षच वाहूं नये वाटतें ? "

" इंदूताई, बहिणीनं बहिणीची सेवा केली तर त्यांत उपकार मानण्यासारखं काय आहे बरं ? "

" काय नाहीं तेंच सांगाना ! "

" इतर कुणाचंहि न ऐकतां माझ्या सांगण्याप्रमाणं मुलाचं नांव तुम्हीं अमृत ठेवलंत. उपकाराची उधारी राखावयाची नाहीं हा त्यांतला हेतु मला समजला नाहीं असं का तुम्हाला वाटतं ? "

" हेतु कसला त्यांत ? बाळ तुमचा नी माझा दोघांचाहि नाहीं का ? मी त्याला जन्म दिला आणि तुम्ही त्याचे प्राण वांचविले. "

" उद्यां तुमचें पतिराज येतील आणि तुम्हांला घरीं घेऊन जातील. मग अमृत पुन्हां मला पहायला तरी मिळेल का ? "

मरणाच्या दारीं पडलेला मनुष्य प्रिय व्यक्तीकडे ज्या आसावलेल्या दृष्टीनें पहातो, त्या दृष्टीनें सिंधू जवळच निद्रानंदीं तल्लीन झालेल्या अमृताकडे पाहूं लागली.

" कां नाहीं पहायला मिळणार ? तुम्ही, मी नि अमृत एके ठिकाणींच राहूं म्हणजे झालं " इंदू लडिवाळपणानें म्हणाली.

" इंदूताई, मी तुमच्या एवढी लहान होतें तेव्हां मलाहि अशींच मोहक मनोराज्यं दिसत होतीं. पण बालपणांतलीं स्वप्नं पुढें खरीं होत नाहींत. लहानपणीं आईबापांना सोडून दूर रहाण्याची कधीं काळीं पाळी येईल हें खरेंहि वाटत नाहीं, पण लग्नाच्या दिवशीं त्या दुःखाचा अनुभव मी घेतला. तिथेंहि मनांतले मांडे मनांतच राहिले आणि इस्पितळांतल्या वेड्याप्रमाणं एकट्यानं रहायचं, एकट्यानं जेवावयाचं, एकाट्यानं वावरायचं आणि एकट्यानंच बोलायचं कपाळीं आलं. "

" खरंच, काल तुम्ही रडूं लागलांत म्हणून तुम्हांला मी अधिक विचारलं नाहीं. तुमच्यासारख्या प्रेमळ पत्नीला टाकून देणारा राक्षस या जगांत असेल हें मला खरं देखील वाटलं नसतं. "

" इंदूताई, जगांत दिसणाऱ्या पाषाणांपेक्षां अधिक कठोर पाषाण पुरुषांच्या हृदयांत असतात. बिळांत दडून बसणाऱ्या सापांपेक्षां अधिक विषारी शब्द पुरुषांच्या तोंडांत असतात. पुरुष ! इंदुताई, पुरुषजात तेवढी निर्दय नि निष्ठुर ! "

" सिंधूताई, पुरुष राक्षस असतील; पण पति हा देवच असतो नाहीं वरं ? निदान माझा तरी अनुभव तसा आहे. "

“ तुम्हीं भाग्याच्या म्हणून तुम्हांला हा पुरुषांच्या देवपणाचा विरळ अनुभव आला. माझा अनुभव अगदीं–अगदीं कडू जहर आहे. पति हा देव खरा; पण तो अग्निदेव आहे. त्यानें कशाहि जिभा चाटल्या तरी जवळचा मनुष्य पोळूनच निघायचा. लग्नाच्या वेळीं कबूल केलेल्या पैशांपैकीं एक हजार रुपये वेळेवर पोंचले नाहींत म्हणून—”

“ म्हणून तुम्हांला तुमच्या यजमानांनी टाकली ? काय ग बाई उलटं काळीज असतं पुरुषांचं. ”

“ बाबा त्यावेळींच आम्हांला सोडून गेले होते. कर्जदारांनीं दारांत धरणं धरलं होतं. दादा दांतीं तृण धरून तिकडे शरण गेला; पण रक्तासाठीं तहानेलेला वाघ आईचं एकुलतं एक मूल थोडंच सोडून देणार आहे ? इंदूताई, त्या हजार रुपयांनीं माझा संसार पार बुडविला. पैसा ! पैसा ! या पैशाच्या पायीं मुलगा बापाचा खून करतो आणि नवरा बायकोला सोडून देतो. ”

उद्वेग व आवेग यांच्या मिश्रणानें सिंधूच्या चेहऱ्यावर मल्लल तांबडेपणा दिसत होता. इंदूचा सात्त्विक संतापहि अनावर झाला. ती सद्गदित कंठानें म्हणाली, “ पुन्हा कधीं चौकशीदेखील केली नाहीं त्यांनीं तुमची ? ”

“ चौकशी ? गाईचा पाय मोडून जाणारी मोटार तिची चौकशी करायला थांबेल ? दादाच्या कृपेनं माझं शिक्षण पुरं झालं म्हणून मी सुईण तरी झालें. नाहीं तर आज अन्नाला महाग झालें असतें. नव्या बायकोबरोबर पंचपक्वान्नं झोड-तांना आपली पहिली बायको उपाशी असेल अशी शंका येऊन शेवटचा घांस तरी त्यांच्या गळ्याशीं कधीं अडकला असेल असं मला वाटत नाहीं. नवी पैरण आल्यावर लहान मुलाला जुन्या पैरणीची जशी आठवण होत नाहीं, तशीच बाय-कांची स्थिति आहे. इंदूताई, माझं लग्न म्हणजे दुसरं कांहीं नाहीं, ‘ चाटलं न् बाटलं ’ अशांतली गत. या कारणामुळंच मी सासरचं नांवदेखील लावीत नाहीं. नांवाचा डाग तरी हवा कशाला ? त्यापेक्षां ज्या गांवांत देवानं जन्म दिला त्याचंच नांव लावलेलं काय वाईट ? ” .

“ सिंधूताई, अशा राक्षसांना चांगलीच शिक्षा व्हायला पाहिजे. कुंपणच जर शेत खाऊं लागलं तर माणसानं करायचं तरी काय ? तुम्ही किनई तुमच्या नवऱ्याचं नांवगांव द्या मला लिहून; उद्यां स्वारी आली म्हणजे तिकडे सांगून त्याचं कांहीं पारिपत्य करतां येईल का मला पहायचंय. तिकडील स्वारी मात्र इतर पुरुषांसारखी

नाहीं हं. मी देखील दुसरेपणाचीच बायको; पण पहिलीला टाकणं झालं तें ती वाईट चालीची होती म्हणून. ''

' वाईट चालीची ' हे शब्द ऐकतांच सिंधू चपापली. इंदूचें तिच्याकडे लक्षच नव्हतें. ' आमच्या घरीं मला अगदीं फुलासारखं वागविणं होतं. मुंबई इतकी लांब पडली नि व्यापाराचा मोसम आहे म्हणून ! नाहीं तर अमृताला पहाण्याकारितां एव्हांना किती तरी खेपा झाल्या असत्या. उद्यां स्वारी आली कीं, तुमची गोष्ट सांगतेंच बघा. स्वारीच्या ओळखी किती तरी आहेत; आणि वजनहि—छेः बाई, पण मी आपली आपणच स्तुति करूं लागलें कीं ! स्वारीकडून तुमच्या नवऱ्याला आणवितें आणि अशी खरडपट्टी काढतें कीं—'

इंदू उत्साहानें बोलत होती; पण सिंधूची मुद्रा गंभीरच होती. इंदूला वाटलें कीं, सिंधूचा आपल्या बोलण्यावर भरंवसा बसत नाहीं. तिनें सिंधूचा हात घेऊन त्याच्यावर आपला हात ठेवला आणि म्हणाली, '' हें घ्या वचन सिंधूताई, स्वारीकडून तुमच्या नवऱ्याचा पत्ता लाववीन आणि त्याला जन्मभर आठवण राहील अशी शिक्षा करवीन तरच नांवाची इंदू ''

सिंधूला तिच्या या भावनापूर्ण स्वभावाचें हंसू आलें. पण तें हंसणें अविश्वासाचें आहे असें वाटून इंदू म्हणाली, '' तिकडील स्वारी यांत लक्ष घालणार नाहीं असं तुम्हांला वाटत असेल, पण स्वारीचा स्वभाव किती मोकळा नि उदार आहे म्हणतां ? मला दिवस गेल्यानंतर वरचेवर बरं वाटेनासं झालं. शेजारणी–पाजारणी म्हणूं लागल्या, सवतीची बाधा सुरू झाली, सवत सूड घ्यायला लागली. मलादेखील तें खरें वाटूं लागलें. पण स्वारी म्हणे, कसली सवत आणि कसला सूड ! ती वाईट चालीची असली म्हणून कांहीं इतकी दुष्ट नव्हती. स्वारीचा फोटोच दाखवितें तुम्हांला म्हणजे स्वभाव किती मोकळा नि परोपकारी आहे हें तुम्हांला दिसून येईल. मी यापूर्वीच दाखविणार होतें; पण बाई लाज वाटूं लागली. ''

इंदूनें दिलेली ट्रंकेची किल्ली घेऊन सिंधूनें ट्रंक उघडली. ट्रंकेंत फोटो वरच होता. सिंधूनें फोटो उचलला आणि त्याच्याकडे एकवार पाहिलें मात्र ! विजेचा धक्का बसल्याप्रमाणें तिला झालें. तो फोटो तिच्या पतीचाच होता.

दिवसा तुफान समुद्राप्रमाणें भासणारी मुंबई मध्यरात्रींच्या मोहिनीनें प्रशान्त सरोवराप्रमाणें दिसत होती. निद्रादेवीच्या मंदिरांत पाऊल टाकतांना जणुं काय सर्व

वासनांचा तिनें त्यागच केला होता. रणांगणावरील धुमश्चक्रीनें तपोवनांतील सौम्य शांततेचें स्वरूप धारण केलेलें पाहून आकाशांतील तारे एकमेकांकडे डोळे मिचकावून पहात होते. इंदूच्या खाटेजवळच निजलेल्या सिंधूचें मन मात्र बाहेर शांतीचें साम्राज्य पसरलें असूनहि क्षुब्ध झालें होतें. ज्या इंदूवर तिचें प्रेम जडलें होतें ती तिची सवत होती. ज्या अमृताचा मुका घेतल्यावांचून तिला घटकाभरहि रहावत नव्हतें, तो तिचा सावत्र मुलगा होता. अमृत झाला तेव्हां त्याचा चेहरा आपल्याला ओळखीचासा कां वाटला हें कोडें इंदूच्या ट्रंकेंतील फोटो दृष्टीला पडतांच तिला उलगडलें. इंदू आपली सवत ही कल्पनाच किती तरी वेळ तिला खरी वाटेना. आतांपर्यंत आपल्या सवतीचें जें चित्र ती आपल्या मनापुढें उभें करीत असे, तें कळकट चेहऱ्याची व कुढ्या मनाची एक बाई असें होतें. आपल्या संसारसुखाचा वृक्ष मुळांतच छिन्नभिन्न करून टाकणारी कुऱ्हाड बाहेर सोन्याची व आंत लोण्याची असेल हें तिला स्वप्नांतदेखील खरें वाटलें नसतें. मनांतील वादळामुळें तिला अंथरुणावर स्वस्थ पडून राहवेना. ती अंथरुणावर उठून बसली व जवळच निद्रेच्या बाहुपाशांत विश्वस्त रीतीनें झोंपी गेलेल्या त्या मातापुत्रांकडे पाहूं लागली. रात्र व मद्य या दोहोंच्याहि अंमलाखालीं मनुष्याचें मन बेताल होतें. सिंधूचेंहि तसेंच झालें. पतिसुखाच्या अमृताचा पेला आपल्या ओठापासून जिनें ओढून घेतला, अपत्यसुखासाठीं तळमळणाऱ्या आपल्या हृदयावर जिनें धगधगीत निखारे ठेविले ती आपली सवत समोर सुखानें निजलेली पाहून सिंधूचा त्वेष अनावर झाला. तिच्या क्षुब्ध मनांत विचारोर्मि उसळूं लागल्या. ‘ सुरी सोन्याची झाली म्हणून तीं कांहीं पोटांत खुपसून घ्यायची नाहीं. मी इंदूच्या बाळंतपणासाठीं आलें तेव्हां ही माझी सवत आहे, हें मला कळलं असतं तर–तर–तिला वांचविण्याची मी इतकी खटपट केलीच नसती. आयता माझ्या वाटेंतलाच कांटा दूर झाला असता. छेः ! पण इंदू फूल आहे; कांटा नाहीं. ती माझी सवत झाली, यांत तिचा काय अन्याय आहे ? पूर्वीच्या बायकोला टाकून देणाऱ्या मनुष्याशीं मी लग्न करणार नाहीं असं तिनं सांगावयाला नको होतं काय ? पण ती सांगणार कशी ? पहिली बायको असलेल्या नवऱ्याच्या गळ्यांत तर राहोच, पण अर्ध्या गोंवऱ्या स्मशानांत गेलेल्या थेरड्याच्या गळ्यांतदेखील बापानं सांगितलं म्हणजे मुलीला माळ घालावी लागते. गाय, शेळी आणि हरिणी यांच्या गरीबपणाचं मिश्रण करूनच ब्रम्हदेवानं हिंदु मुलगी जन्माला घातलेली असते. पण इंदूनं नसला तरी तिच्या वडिलांनीं विचार करायला नको होता

काय ? उद्यां आपल्या पोरीचा गळा कापून हा राक्षसी नवरा तिसरं लग्न करूं लागला तर आपल्याला काय वाटेल हें त्यांनीं ध्यानांत आणायला नको होतं का ? आपली मुलगी चांगल्या स्थळीं पडावी म्हणून दुसऱ्या मुलीला सवाष्णपणीं विधवा करण्याचा त्यांना काय हक्क होता ? त्यांनाच चांगली जबर शिक्षा झाली पाहिजे. पण इंदूच्या वडिलांना आपण शिक्षा कशी करणार ? मुलीचं बरंवाईट झालं तरच त्यांना दुःख होईल. आणि त्यांना शिक्षा करणं म्हणजे वड्याचं तेल वांग्यावर काढल्यासारखं होईल. पहिली बायको वाईट चालीची आहे, असं सांगून ज्यांनीं त्यांना मुलगी द्यायला लावलं, त्यांचा गुन्हा सर्वांत मोठा नाहीं का ? शिक्षा करायचो, सूड घ्यायचा तर सुखाचा कणदेखील न देतां कुंकवाच्या टिळ्यावर आपली बोळवण करणाऱ्या नवऱ्याचाच घेतला पाहिजे. स्वारी उद्यां मोठ्या आनंदानं मुलाला पहायला येणार आहे. मुलाला डोळे भरून पहाण्याऐवजीं डोळ्यांत पाणी आणून पाहण्याची पाळी त्यांच्यावर आपल्याला सहज आणतां येईल. ' या शेवटच्या विचारानें सिंधूच्या हृदयाचा थरकांप झाला. व्यवहारांत मोठ्या वस्तूच्या आंत लपलेली वस्तु तिच्यापेक्षां लहान असते; पण मनामध्यें लहान पापाच्या पोटांत मोठें पाप दडून बसलेलें असतें. नवऱ्याविषयीं तिला वाटणारा तिटकारा अगर त्याला कांहीं तरी दुःख व्हावें ही तिची इच्छा स्वाभाविक होती. पण या इच्छेचें पर्यवसान अमृताचा घात करण्याच्या कल्पनेपर्यंत येऊन पोंचेल अशी तिला कल्पनाहि नव्हती. आकाशांतून कोसळून पडणाऱ्या विजेला तरी आपण एखाद्या गोरगरीबाच्या घराची राखरांगोळी करणार आहों, हें प्रथमतः कुठें माहीत असतें ? आपल्या पापी विचारांची तिची तिलाच लाज वाटूं लागली. ती हळूंच उठली व इंदूपाशीं निजलेल्या अमृताला अलगद उचलून तिनें त्याचा मुका घेतला. तिच्या डोळ्यांतून घळघळ आंसवें वाहूं लागलीं. ' आपलं पाणी तीरानं गढूळ केलं, म्हणून नदीच्या प्रवाहानं तीरावरील वेल उपटून टाकणं योग्य होईल काय ? निष्पाप निरपराधी अमृत आपलाहि मुलगा नाहीं का ? पण आपणहि निष्पाप व निरपराधीच होतों. आपल्या भावाला हजार रुपये देण्याचं सामर्थ्य नव्हतं हा अपराध कीं काय ? चोर सोडून संन्याशाला सुळी देऊं नये हें खरं; पण सुळावर चढणाऱ्या संन्याशाच्या अंतःकरणांत या अन्यायाचा सूड घेण्याचा विचार येऊं नये, असं म्हणणं न्यायाचं होईल का ? तें कांहीं नाहीं; ईश्वरेच्छेनं अमृताचं विष होतं मग मनुष्याच्या इच्छेनं औषधाचं विष व्हायला कितीसा उशीर लागणार ? निरपराधी पत्नीच्या अंतःकरणावर

घाव घालायला जें दुष्ट अंतःकरण कचरलं नाहीं त्याच्यावर पुत्रशोकासारखा जबरदस्त घावच घातला पाहिजे.' शेवटचा विचार मनांत येतांच तिचे हात थरथर कांपूं लागले व आपल्या हातांतून अमृत खालीं जमिनीवर पडतो कीं, काय असें तिला वाटूं लागलें. स्वार्थानें माणूस राक्षस होतो. नवऱ्याचा सूड आपण अमृताला मारून घेणें म्हणजे एकानें गाय मारली म्हणून दुसऱ्यानें वासरूं मारण्यासारखें आहे, हा विचार तिच्या मनांत तात्काळ यावयाला व इंदूनें झोंपेंत 'सिंधूताई, सिंधूताई, माझ्या बाळाला वांचीव--माझ्या अमृताला वांचीव' असें घाबरून म्हणायला एकच गांठ पडली. सिंधू चपापली. आपल्या अंतःकरणांतील दुष्ट विचारांची खळबळ झोंपी गेलेल्या इंदूलाहि ऐकूं गेली काय ? तिनें इंदूला जागें केलें. जागी झाली तरी इंदु 'सिंधूताई, अमृताला वांचीव' हेच उद्गार काढीत होती.

'झालं काय असं ?' सिंधूनें पश्चात्तप्त स्वरानें विचारलें.

इंदू घोगऱ्या स्वरांत म्हणाली, "मला किनई एक स्वप्न पडलं. त्यांत माझी सवत हातावर अमृताला घेऊन एका उंच डोंगराच्या कड्यावर उभी आहे असं दिसलं. त्याच्या अंगाखालून एक हात तिनं काढून घेतला व म्हटलं, "मी अश्शी याला दरींत टाकून देतें." मी पायां पडलें, मला हवं तर लोटून दे म्हणून विनविलं; पण ती मुळींच ऐकेना. "याच्या बापानं मला असंच लोटून दिलें. बापाचं पाप सापासारखा दावा धरतं व मुलाला चावतं." एवढं तिनं म्हटल्याबरोबर मी घाबरून तुला हांका मारायला सुरवात केली. सिंधूताई, हें स्वप्न अगदीं वाईट पडलं नाहीं ग ? माझ्या अमृताचं—"

इंदूच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. सिंधू तिचें सांत्वन करीत म्हणाली, "असं काय बरं करावं वेड्यासारखं ? मनुष्याच्या आशा नि स्वप्नं सगळींच कुठं खरीं होतात का ?"

"पण माझा अगदीं धीर सुटला आहे. तुझ्या नवऱ्याचं पारिपत्य करण्याचं मी तुला वचन दिलं तसं माझ्या अमृताला संभाळण्याचं तूंहि मला दिलं पाहिजेस. अमृत, आतां सिंधूताईच तुझी आई बरं !"

इंदूची बावरलेली मनःस्थिति पाहून सिंधूनें अमृताला पोटच्या मुलाप्रमाणें मानण्याचें तिला वचन दिलें. 'मीच तुझी सवत.' हे शब्द सिंधूच्या अगदीं ओठाशीं आले होते. पण हें ऐकून पुन्हां त्या भयंकर स्वप्नाचा धक्का इंदूला बसेल असें

तिला वाटलें. तिनें ते शब्द आंतल्या आंतच गिळले. " मला नुसतं हाताचं चुंबन नको, ओंठाचं पाहिजे. " इंदू लाडकेपणानें म्हणाली.

" ओठाचं ? " सिंधू थट्टेनें म्हणाली. " म्हणजे मी तुझा मुका घेऊं कीं काय ? उद्यां तुझ्या पतिराजांना हें कळलं म्हणजे ते माझ्यावर हक्काबद्दल फिर्याद करतील ना ? "

" माझा नाहीं मुका घ्यायचा. तूं नि मी दोघींहि अमृताच्या आई झालों. तेव्हां एका गालाचा तूं मुका घे नि दुसऱ्याचा मी घेतें."

अमृत डोळे उघडून पाहूं लागला तों उजवा गाल सिंधूताईच्या ताब्यांत व डावा आईच्या ताब्यांत गेला आहे. त्या बिचाऱ्याला बापाची कल्पना नव्हती म्हणून बरें होतें; नाहीं तर आतां बापाला कुठला गाल मिळणार या काळजींत तो एडला असता !

* * *

सकाळीं उठल्यापासून सिंधूचें मन विचाराच्या वावटळींत सारखें गिरगिर फिरत होतें. दुपारीं भास्करराव पुत्रमुख पाहण्याकरितां येणार, त्यावेळीं आपण आपलें तोंड कुठें तरी लपविणेंच चांगलें असें एक वेळ तिला वाटे. दुसऱ्याच क्षणीं अन्या-यानें मुस्कटदाबी केल्यामुळें आतांपर्यंत मुका राहिलेला तिचा स्वाभिमान वर उफाळून येई व त्याला वाचा फुटे. " तुला त्यांना भिण्याचें काय कारण आहे ? तूं एकदम निघून गेलीस तर मात्र तुझी बाजू लंगडी होती असं जगाला म्हणायला मिळेल. ज्यानं बायकोला अन्यायानं टाकली तो नवरा कसला आणि त्याच्या नवरेपणाची किंमत ती काय ? मून विटलं नि सुतक फिटलं. येऊं दे. खुशाल त्याला येऊं दे. पालीपुढें विंचू नांगी टाकतो त्याप्रमाणं सत्यापुढं पापाची मान खालीं गेलीच पाहिजे. " असा उपदेश हा अभिमान करूं लागला. टाकायचें तें टाकून वर वाईट चालीची म्हटल्याबद्दल तिला जी चीड आली होती, ती नवऱ्याचा सूड घेण्याविषयीं, कोणत्या ना कोणत्या रीतीनें त्याला दुःख होईल अशा रीतीनें वागण्याविषयीं तिला चिथावीत होती. शेवटीं खऱ्याला मरण नाहीं असें ठरवून नवरा येईल त्या वेळेला घरींच रहावयाचें असा तिनें निश्चय केला.

भास्करराव येतांच त्यांच्याकडे अगदीं रोखून पहावयाचें तिनें ठरविलें होतें. पण त्यांची गाडी दाराशीं थांबतांच तिचें हें अवसान गळालें. गच्चीवर जाऊन गाडी-कडे पाहण्याचें देखील तिला धैर्य झालें नाहीं. ती एखाद्या पुतळीप्रमाणें जागच्या

जागीं खिळून राहिली. त्यांचीं पावलें जिन्यावर वाजतांच तिचें अंग लटपट कांपूं लागलें. तिनें तात्काळ अमृताला उचललें व ती शेजारच्या खोलींत गेली. आनंदित झालेल्या इंदूचें सारें लक्ष दाराकडे असल्यामुळें, तिच्या हें लक्षांतहि आलें नाहीं.

भास्कररावांची स्वारी उत्सुकतेनें खोलींत आली. नवें खेळणें पहावयाला उत्कंठित झालेल्या मुलाप्रमाणें त्यांनीं सभोंवार दृष्टि फेंकली. चटकन् सस्मित मुद्रेनें वर पाहून पुन्हां खालीं पाहणाऱ्या इंदूखेरीज त्यांच्या दृष्टीला कांहींच दिसलें नाहीं. फूल तोडण्याकरितां वेलीजवळ जाणाऱ्या मनुष्याची तिच्यावर फूल नाहीं असें पाहून जशी निराशा होते, त्याचप्रमाणें भास्कररावांची स्थिति झाली. अमृतचें कांहीं बरेंवाईट तर झालें नाहीं ना, अशी भयंकर शंकाहि त्यांच्या मनाला स्पर्श करून गेली. पण इंदूचा हंसरा चेहरा या दारुण शंकेचें निरसन करण्याकरितां पुढें उभा असल्यामुळें, आपल्या मनाच्या भित्रेपणाचें त्यांचें त्यांनाच हंसूं आलें.

‘ मला वाटलं होतं देवी प्रसाद देण्याकरितां तो हातांत घेऊन अगदीं उभी असेल ’ भास्कररावांनीं संभाषणाला सुरवात केली.

“ देवी उगीच नाहीं प्रसाद देत. तिला आधीं प्रसन्न करून ध्यावी लागते हो. ” इंदू हंसत हंसत उद्गारली.

“ बारशाच्या दिवशीं यायला मिळालं नाहीं त्याचा राग आहे वाटतं हा ? रागाची बाकी अगदीं चक्रव्याढव्याजानं काढलेली दिसते ! पण बायकांना राग कधींच शोभत नाहीं. खरं रागवावं पुरुषांनीं नि खरी माया करावी बायकांनीं.”

“ चांगली वांटणी आहे ही रागा–लोभाची. रस मला नि चोयट्या तुला. ”

“ राग अगदीं नाकावर बसला तरी त्याला घालायची वेसण आहे माझ्यापाशीं ! नवी नथ पहाल तर—”

“ दागिन्यानं जाणारा हा राग नाहीं बरं ! ”

“ दागिना देखील नकोसा झाला आज ? अरे बापरे ! वैराग्याचा झटका आला आहे वाटतं मोठा ? या वैराग्याच्या वाऱ्यावरोवर वहात वहात मला सोडून जाण्याचा नाहीं ना विचार राणीसाहेबांचा ? ”

“ इतकी नको कांहीं थट्टा करावयला. सिंधूताई आपल्याला माहीत असेलच.”

“ सिंधूताई ! कोण सिंधूताई ? ”

“ माझी वहीण.”

" बायकांना मुलाबरोबर बहिणीहि बऱ्या मिळूं लागतात बुवा. "

" सिंधूताई मोठी शिकलेली सुईण आहे. तिनंच बाळंतपणांत माझे प्राण वांचविले. इकडं सारं लिहून कळविलं होतं मी. "

" ती काय उधारी बाकी आहे म्हणून माझ्या लक्षांत राहील ? " हें वाक्य ऐकतांच इंदूचा चेहरा किंचित् उतरला; पण भास्कररावांचें तिकडें लक्षच नव्हतें.

" बरं, ही सिंधूताई तुझी बहीण आहे पण पुढें काय ? तिचे उपकार फेडायचे असले तर तिला एखादा ठळकसा दागिना करून देऊं म्हणजे झालं. "

" तिचा मुख्य दागिना हरवला आहे. तो शोधून दिला पाहिजे. "

" केसरींत जाहिरात देऊं या ! "

" केसरींतल्या जाहिरातीनं सांपडण्यासारखा दागिना नाहीं हा. पति हाच स्त्रीचा अलंकार असें म्हणतात ना ? "

" तिचा नवरा बेपत्ता झाला आहे वाटतं ? त्यालाहि उपाय जाहिरात हाच. हरवलेल्या वस्तूवर ' केसरी 'तील जाहिरात हा अगदीं रामबाण उपाय आहे. "

" तिच्या नवऱ्यानं तिला टाकून दिली आहे. "

" वाः ! तूं आतां असल्या मध्यस्थ्या करायला लागलीस का ? उद्यां म्हणशील माझ्या सवतीलाच घरांत परत बोलावून आणा म्हणून."

" मी गडे सिंधूताईला वचन दिलं आहे आपण तें पुरं केलंच पाहिजे ! "

" बायकांनीं वचनं द्यावीं नि पुरुषांनीं तीं पाळावीं ! खासा न्याय ! "

" बायकांनीं रांधावं नि पुरुषांनीं जेवावं हा जसा न्याय, तसाच हा."

" उगीच हवा कशाला तो वाद ? तूं सांगशील तें करायला मी तयार आहें. मग तर झालं ? "

" ती आपल्या नवऱ्याचं नांवगांव देईलच. त्याला शोधून काढून सिंधूताईला परत तरी घ्यायला लावावं, नाहीं तर त्याला चांगली अद्दल घडेल अशी शिक्षा तरी करावी–अगदीं वचन दिलं पाहिजे मला."

" दुसऱ्या कुणी असं कांहीं सांगितलं असतं तर मी त्याला वेड्यांतच काढलं असतं ! पण तूं पडलीस लाडकी बायको. शिवाय वचन नाहीं दिलं तर प्रसादाला तितका अधिक उशीर लागणार ! तुझ्या सिंधूताईच्या नवऱ्याला शोधून काढून त्याला जन्मभर आठवण राहील अशी शिक्षा करूं या. आतां तर झालं ना ? "

इंदूचा आनंद आतां गगनांत मावेना. ती मोठ्यानें म्हणाली, " सिंधूताई अग, सिंधूताई, अमृतला इकडं दाखवायला घेऊन ये नि आतां तुझी आणि तुझ्या पतिराजांची गांठ पडलीच म्हणून समज. "

इंदूची कल्पना सिंधू लगबगीनें बाहेर येईल अशी होती. ती येत नाहीं असें पाहून इंदू आंतल्या खोलींत गेली. सिंधू नको नको म्हणत असतांनाच तिला ओढीत तिनें बाहेर आणलें. सिंधूच्या चेहऱ्याकडे भास्कररावांची नजर जातांच ते अगदीं काळेठिक्कर पडले.

" ही सिंधूताई, हिच्या नवऱ्याला शोधून काढून चांगली शिक्षा केली पाहिजे हं. " इंदू हंसत हंसत म्हणाली.

आतां मात्र सिंधूच्यानें राहवेना. ती म्हणाली, " हे काय शिक्षा करणार ? खुनी मनुष्य न्यायाधीश होऊन स्वतःला फांशी देण्याचा हुकूम फर्मावील का ? "

" म्हणजे ? " इंदूनें आश्चर्यानें विचारलें.

" इंदूताई, " सिंधू स्फुंदत म्हणाली, " ही कपाळकरंटी सिंधूच तुझी सवत आहे. " संथ अशा गंगाप्रवाहांतून अग्निवर्षाव झाल्याप्रमाणें इंदूला वाटलें. भास्कर-रावांच्या मुद्रेवरून सिंधूचें सांगणें सत्य असल्याचें तिनें जाणलें. ती सुन्न झाली; पण क्षणभरच ! कठोर दृष्टीनें पहात तिनें कठोरतर स्वरानें भास्कररावांना विचारलें, " हिला आपण टाकून कां दिलंत ? "

वर्मी गोळी लागलेला वाघ जीवाच्या आकांतानें पारध्यावर जशी झडप घालूं पाहतो तशा प्रकारचा प्रयत्न करीत भास्करराव म्हणाले, " ती वाईट चालीची होती म्हणून. "

आतांपर्यंत सिंधूनें आपला संताप कसाबसा आंवरून धरला होता. आतां मात्र तिच्यानें राहवेना. सत्याच्या तेजानें तळपणाऱ्या मुद्रेनें ती उद्गारली, "वाईट चालीची ! मी वाईट चालीची होतें कीं, तुम्हांला हजार निर्जीव रुपड्यांची किंमत चालत्या-बोलत्या बायकोपेक्षां जास्ती वाटली ? करा, प्रमाण करा; हा माझ्या हातांत तुमचा मुलगा आहे. याची शपथ घेऊन सांगा कीं, मी वाईट चालीची होतें म्हणून. मात्र खोटं बोलणाराचं देव कधींहि बरं करणार नाहीं हें पक्कं ध्यानांत ठेवा. "

सिंधूनें अमृताला भास्कररावांच्या पुढें केलें. शपथ घ्यावयाला त्यांचें मन धजेना. त्यांचा खोटेपणा तात्काळ इंदूला कळून चुकला. सिंधूला आपलें हृदय फुटून जातें कीं काय असें वाटूं लागलें. अमृताला इंदूकडे देऊन ती म्हणाली, " इंदूताई,

जातें मी आतां. यापुढें तुझी माझी गांठ देवाघरीं. कारण–तुला सांगायला नकोच–बाळ अमृत, तुझे बोबडे बोल ऐकण्याची माझी फार फार इच्छा होती. पण—" पुढें सिंधूला बोलवेना. तिच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. रडत रडत सिंधू बाहेर निघालेली पाहून इंदूनें तिचा हात धरला व ती म्हणाली, "चल सिंधूताई मीहि येतें तुझ्याबरोबर !"

भास्करराव स्तंभितच झाले ! "या सवतीनें कांहीं जादूटोणा केला कीं काय तुझ्यावर ?" ते केविलवाण्या स्वरानें इंदूला उद्देशून म्हणाले. "ती तुझा सूड घेत आहे सूड !"

"तिला अशा राक्षसीपणानं वागविल्याबद्दल मीच तुमचा सूड घेणार आहें. मी नि अमृत यापुढं सिंधूताईकडंच राहणार !"

"उपाशीं मरायची अवदसा आठवली वाटतं तुला ?" भास्करराव खेंकसून म्हणाले.

आतां मात्र सिंधू मध्यें पडली. ती संतापानं थरथर कांपत म्हणाली, "पोटाची कशाला भीति घालतां तिला ? सिंधूच्या नांवावर पांच हजार रुपये बँकेंत आहेत कीं नाहींत याची खात्री करून घ्या आणि मग असल्या पुरुषी धमक्या घाला."

भास्करराव हतबुद्ध झाले. 'इंदू इंदू–' पुढें काय बोलावयाचें हेंच त्यांना सुचेना. इंदूनें मान वळून त्यांच्याकडे पाहिलें देखील नाहीं. अमृताचा गाल डोळ्यांतल्या आंसवांनीं भिजवीत ती मोठ्यानें म्हणाली, "बाळ, तूं कठोर पुरुषाच्या जन्माला आला आहेस. कुणासारखाहि हो; पण आपल्या बापाच्या वळणावर मात्र जाऊं नकोस !"

१९२८

# दृष्टि-लाभ

वर्तमानपत्राच्या एका धोंड्यानें द्रव्यप्राप्ति व देशभक्ति हीं समाजवृक्षाच्या शेंड्यावरील दोन्ही फळें मीं अचूक पाडलीं होतीं यांत संशय नाहीं. संपादक बनतांच मी विद्यापीठाच्या शिक्षणक्रमावर ताशेरा झाडूं लागलों, राजकारणांत गांधींना मार्ग-दर्शक होण्याचा प्रयत्न केला आणि सुधारकांवर असे कोरडे उडविले कीं, त्यांनीं आगरकरांचाच धांवा करावा. सुधारकांचा कट्टा द्वेष्टा व सनातन धर्माचा बडा पाठि-राखा म्हणून माझा विशेष लौकिक होता. जिल्ह्यांत कुठें कांहीं नवीन घडो; त्याची हकीकत माझ्या कानीं आली कीं, जोरदार शब्द, उद्गारचिन्हें वगैरे मसाला भरपूर घालून मी ती चटकदार करीत असें. देवापुढें कोंबडीं, बकरीं, रेडे वगैरे बळी देण्याच्या चालीचें समर्थन करतांना 'मांसाहारी लोक दररोज हजारों प्राण्यांचा संहार करतात, त्यांत आणखी थोडी भर पडली म्हणून काय बिघडतें?' असें लिहावयाला मी कधींच कचरलों नाहीं.

आज एका प्रौढ विधवेच्या पुनर्विवाहावर असाच जळजळीत लेख मी लिहिला. "ज्या हिंदुस्थानांत सिता-द्रौपदीसारख्या पतिव्रता झाल्या, त्यांतल्या बायकांनीं आतां पाट लावावेत काय? केवढी ही हिंदुधर्माची अवनति!!! लग्नांतच असें काय विशेष पुरून ठेवलेलें असतें? आपल्या आप्तेष्टांच्या घरीं स्वयंपाक करणें, त्यांचीं धुणीं धुणें, मुलें खेळविणें वगैरे कामांपासून होणाऱ्या सात्त्विक सुखापेक्षां लग्नापासून होणारें तामस सुख अधिक महत्त्वाचें आहे काय? 'परोपकाराय सतां विभूतयः' या कविवचनाप्रमाणें पाहतां विधवेची गणना विभूतींतच करावी लागेल. विभूतिपद सोडून त्यांनीं सामान्य मनुष्य होणें हा त्यांचा अधःपात आहे. मद्य, मांस आणि मैथुन यांच्याकडे प्राणिमात्राची प्रवृत्ति असते असें मनूनें म्हटलें आहे. पण निवृत्ति हाच हिंदु विधवांचा मुख्य गुण

आहे. सधवेचा जसा पति हाच देव त्याप्रमाणें विधवेला देव हाच पति ” अशा वाक्यांनीं त्या लेखाचा शेवट करून फिरायला जायची वेळ झाल्यामुळें, मी उठलें व लेख खिशांत टाकून प्रो. जोशी यांच्या घरीं गेलें.

प्रो. जोशी हे पुण्याच्या एका कॉलेजांत इंग्रजी व मराठी या विषयांचे प्रोफेसर होते. आमच्या गांवीं त्यांची सासुरवाडी असल्यामुळें ते दोन दिवसांपूर्वी इकडे आले होते. आपण होऊन त्यांनीं माझी ओळख करून घेतल्यामुळें, मला त्यांच्या-विषयीं—ते एक आधुनिक कवि असूनहि—फार आदर वाटत होता. आजचा लेख त्यांना वाचून दाखवायचा अशा इराद्यानेंच मी तो बरोबर घेतला.

जोशांच्या—म्हणजे त्यांच्या सासऱ्यांच्या घरीं गेलें. ते कसलीशी कविता मोठ्यानें वाचीत होते. ‘ या संपादक ’ असें माझें स्वागत करून ते म्हणाले, “ केशवसुतांची ही कविता वाचली आहे का तुम्हीं ? ”

“ कसले केशवसुत घेऊन बसलां आहांत तुम्ही प्रोफेसरसाहेब ? मोरोपंतांच्या पासंगाला लागणार नाहींत तुमचे केशवसुत ! ”

“ काव्याची किंमत ग्रंथांच्या वजनानं का करावयाची असते ? ” जोशी म्हणाले.

“ काय तुमच्या आधुनिक कवितेचे एकएक विषय. म्हणे तुतारी ! अहो वेदान्त, भारत, भागवत सारं सोडून तुतारी कुठली सुचली हो या वेड्याला ? उद्यां ढोलावर कविता करतील. ‘ फुटकी तपेली ’ हें काय कवितेचें नांव कीं काय ? ‘ फाटका जोडा ’ हा विषय काय वाईट आहे मग ? ”

“ तो वाद आपण नंतर करूं. या ओळी तर पहा केशवसुतांच्या—”

“ साध्याही विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे ।
नित्याच्या अवलोकनें जन परी होती पहा आंधळे ॥ ”

“ काय आहे हो या ओळींत ? ” मी मोठ्या दिमाखानें म्हटलें. ‘ काय ज्ञाने-श्वरासारखी उपमा आहे, का मोरोपंतासारखें यमक आहे—”

“ वाचकाला काव्यदृष्टि देण्याचं सामर्थ्य आहे. ”

प्रोफेसरसाहेब कपडे करून उठल्यामुळें तो विषय जिथल्या तिथेंच राहिला. समुद्रापर्यंत आम्ही फिरायला जाणार असल्यामुळें, माझा लेख समुद्राच्या वेळेवरच त्यांना वाचून दाखवावयाचें मी ठरविलें. प्रोफेसरसाहेबांनीं मोत्याला सांखळीच्या पाशांतून मुक्त केलें व बरोबर घेतलें. आम्ही अंगणाबाहेर पडतों तोंच मोत्याच्या मागोमाग घाणेरडें कुत्रें लंगडत येत असलेलें मीं पाहिलें.

" ही कुठली हो पीडा ? " मी विचारलें.

" दोन दिवस इथंच अंगणांत येऊन बसतंय तें कुत्रं. त्याची गंमत आली का तुमच्या लक्षांत ?

" लंगडं आहे ना तें ? "

" तैमुरलंग असून समुद्रावर स्वारी करायला निघालं आहे. गोष्ट साधीच; पण तिच्यांत किती अर्थ भरला आहे तो पहा. मोत्या जिथं फिरायला जाईल तिथं आपण जावं असें या लंगड्या कुत्र्यालाहि वाटतं. तुम्ही हाडहुड करा, हांकून द्या, काय वाटेल तें करा, तें मागाहून येणारच ! "

त्या लंगड्या कुत्र्याला मीं थोडेसें धिसपटावून पाहिलें. 'क्यांव क्यांव' करीत त्यानें सन्माननीय माघार घेतली; पण स्वीकृत मार्ग न सोडणाऱ्या महात्म्या-प्रमाणें पुन्हां तें आमच्या मागाहून येऊं लागलें.

रस्त्याच्या एका कडेला निवडुंगाचीं कुंपणें होतीं. मोठ्या कमळाप्रमाणें दिसणाऱ्या त्यांच्या फुलाकडे बोट दाखवून प्रोफेसर म्हणाले, " हें पाहिलंत का आश्चर्य ? " मी पाहूं लागलों. कांटेरी म्हणून गाजलेल्या निवडुंगाचीं फुलें डोळे उघडून जगाकडे पाहात होतीं.

" कांट्यांनीं अंग भरलेलें असलें तरी निवडुंगाचें सुद्धां हृदय फुलतेंच. गुलाब, जाई, जुई यांच्यापेक्षां निवडुंग कांहीं निराळा नाहीं. तुम्हीं त्याचीं फुलें देवाला वाहूं नका हवीं तर; फुलण्याची संधि मिळाली एवढ्यावरच तो आनंदित झाला आहे. "

तें लंगडें कुत्रें आणि हा फुलणारा निवडुंग यांची जात एकच आहे कीं काय याचा विचार करीत मी चाललों असतांना, समोरून एक भिकारीण येतांना दिसली. तिचीं फाटकीं वस्त्रें, तिनें खाकेला लावलेली घाणेरडी झोळी, उभ्या जन्मांत तेलाचा स्पर्श न झालेले तिचे केस वगैरे पाहून मी तर तोंडच फिरविलें. ती आमच्या अंगा-वरून गेल्याबरोबर प्रोफेसर म्हणाले, " पाहिलंत कां तें ? "

" काय ? "

त्यांनीं मागें वळून त्या भिकारणीकडे बोट दाखविलें. आपल्या केसांत तिनें एक बारसें फूल खोवलें होतें.

प्रोफेसर म्हणाले, " पलीकडे रस्त्यावर पडलं होतं तें फूल. किती लोकांनीं पायदळीं तुडविलं असेल कुणाला ठाऊक. तिनें मोठ्या हौशीनें त्याला डोक्यावर बसविलें कीं नाहीं पहा. "

## नवचंद्रिका

एका दिवशीं अनेक विलक्षण दृश्यें पाहून राजपुत्र सिद्धार्थाचें जगाविषयींचें मत वदललें व तो बुद्ध होऊन अरण्यांत निघून गेला. माझ्या दृढमूल मतांनाहि तसाच धक्का बसल्यासारखें मला वाटूं लागलें. थोडे पुढें गेलों तों एक भिक्षुक दोन गाई हांकीत येत असलेला दिसला. त्यानें वांकून प्रोफेसरांना नमस्कार केला. प्रोफेसरांनींहि स्मितपूर्वक प्रतिनमस्कार केला. तो थोडासा पुढें गेल्यावर ते म्हणाले, "या मनुष्याची हकीगत आहे का ठाऊक तुम्हांला ? साधीच आहे पण—"

या साधेपणाच्या समुद्रांतून काय काय रत्नें बाहेर पडणार आहेत हें मला कळेना. मी आश्चर्यचकित होऊन ऐकूं लागलों. प्रोफेसर म्हणाले, "हे पूजा करतात इथं आमच्या घरीं. एकटा ब्राह्मण आहे विचारा घरचा. ना बायको ना पोरं. पण माणसाला स्वस्थ कुठं बसवतं हो ? त्याला पोर नसलें तरी ढोर पाहिजे. या दोन गाई बाळगल्या आहेत पहा."

"दूध विकत असेल त्यांचं."

"छेः, चहापुरतं स्वतःला ठेवून बाकी वासरांना देतो प्यायला. काय गुटगुटीत वासरं झालींत म्हणतां या गाईचीं. भिक्षुकींत मिळविलेला सारा पैसा या गाईच्या बरदास्तींत खर्च करते स्वारी."

"आश्चर्य आहे बुवा." वाळवंटांतल्या रस्त्याकडे वळतांना मी म्हटलें.

"आश्चर्य कसलं त्यांत ? आपल्या मोत्यामागून येणारं हें लंगडं कुत्रं, तो निवडुंग मघांची ती भिकारीण आणि हा भिक्षुक या सर्वांच्या अंतर्यामीं एकच तत्त्व आहे. आनंदाला कवटाळण्याकरतां वस्तुमात्राची जगांत धडपड चालली आहे. कशावर ना कशावर तरी मनुष्याचा जीव बसतो. त्याशिवाय त्याच्या हातून संसाराच्या वाळवंटांतील प्रवास होणारच नाहीं. स्वातंत्र्याकरितां धडपडणारीं राष्ट्रें, पुनर्विवाह करणाऱ्या विधवा, संप करणारे मजूर, या सर्वांच्या अंतःकरणांत हेंच तत्त्व आहे. दुसऱ्याला मिळतो तेवढा तरी आनंद आपल्याला मिळाला पाहिजे असें प्रत्येकाला वाटतेंच वाटतें."

आंधळ्याला एकदम दृष्टि यावी तसें मला झालें. खिशांतला लेख काढून मी त्याचे तुकडे तुकडे केले व ते वाऱ्यावर फेंकून दिले. त्या तुकड्यांमागून मोत्या व मोत्यामागून तें लंगडें कुत्रें धांवलें.

१९२९

# चतुर्भुज !

भुसावळला रात्रींच्या गाडीनें जायचें म्हणून हजामतीचें सामान, परीटघडीचे कोट व शर्ट, केंसांचा कंगवा इत्यादि साहित्य मी गोळा करीत होतों. इतक्यांत दारांत कुणाचींशीं पावलें वाजलीं. वळून पहातों तों माझा मावसभाऊ दिवाकर.

" या तुम्ही दिवाकरपंत ! किती वर्षांनीं मुहूर्त सांपडला रे गृहस्था तुला यायला ? " मी त्याच्या हातांतील खादीचें पाकीट घेतलें व मोठ्यानें ओरडूनच म्हणालों ' आई, अग आई, दोन पेले चहा ठेवायला सांग भागीरथीबाईंना, नि सुंठ फुललेली पहायला लवकर इकडे ये. " दिवाकरानें नुसतें माझ्याकडे हंसून पाहिलें. वर्षाकाळांतील काळवंडलेल्या मेघाप्रमाणें तो दिसत होता. त्या मेघामधून विजेची पुसट चमक दिसावी, त्याप्रमाणें त्यानें उत्तरादाखल केलेलें स्मित मला वाटलें.

" खरेंच दिवाकर, पण हो, तुला आतां महात्मा दिवाकरच म्हटलं पाहिजे. पांच वर्षें झालीं तुला कॉलेज सोडून; पण अजून परदेशी कापडाची चिंधी देखील दिसत नाहीं तुझ्या अंगावर. "

" एवढ्यावरूनच जर मला महात्मा म्हणायचें असेल तर कपड्यावरून तूं गव्हर्नरच ठरशील. "

" बाकी खादी कांहीं तशी वाईट दिसत नाहीं म्हणा. काव्याच्या भाषेंत बोलायचें तर सूर्य देखील नेहमीं खादीचाच पोषाख करीत असतो. "

" खादी चांगली ठरवायला सूर्याला कशाला आकाशांतून खालीं उतरलें पाहिजे ? हें पहा माझें खादीचें पाकीट. कुठल्याहि परदेशी पाकिटाच्या तोंडांत मारील. " मी पाकीट घेऊन पाहूं लागलों. शरदृतूंतील पांढऱ्या शुभ्र मेघांचेंच तें केलें असावें, असा मला भास झाला. ' दिवाकर विनायक पंडित ' हें नांव किती सुंदर अक्षरांत

लिहिलें होतें वर ! " फार आवडलें बोवा आपल्याला हें पाकीट. प्रवासाला तर फार चागलं. मी रात्रीं भुसावळला जाणार आहें तेव्हां बरोबर घेऊन जातों."

"मीहि उद्यां पहांटे जाणार आहें गोव्यांत."

दारांत चहाचे पेले घेऊन आलेली आई म्हणाली, "असें घोड्यावरून येऊन जाण्याइतकी लगीनघाई आहे का रे दिवाकर? बाबू भुसावळला जाऊन चार दिवसांत येईल. रहा ना चांगला आठ पंधरा दिवस. इथं एकट्याला करमणार नाहीं असें वाटत असेल तर बाबूबरोबर भुसावळला जा. आयती मुलगी चार डोळ्यांखालून जाईल."

दिवाकर माझ्याकडे पाहून मान उडवीत म्हणाला, "कुणाची रे मुलगी? भुसावळ मोठें जंक्शन आहे म्हणे. स्टेशनमास्तरची मुलगी असली तर सासरमाहेर करायला आगगाडीचा खर्च तरी येणार नाहीं."

"स्टेशनमास्तर रे कशाला हवेत? तुमचे मामाच नाहींत का तिथें?" चहाचे रिकामे पेले घेऊन आई निघून गेली.

"अस्सं, सुभद्राहरणाकरितां हे आधुनिक अर्जुन भुसावळला जात आहेत तर?"

"सुभद्राहरण कसलें घेऊन बसलास कपाळाचें? हिडिंबापाणिग्रहण आलें नाहीं कपाळीं म्हणजे मिळविली."

बोलायला विषय हवा म्हणून मी विचारलें,

"खरंच तुझ्या गोष्टी फार चांगल्या असतात म्हणे."

"म्हणे म्हणजे? तूं वाचत नाहींस वाटतं?"

"मला रे कुठला वाचायला वेळ मिळतोय? वांटेकरी येतात त्यांच्याशीं हुजत घालायची, सकाळ संध्याकाळ टेनिसला जायचं–शिवाय क्लब आहेच बोकांडीं बसलेला ! काल कां परवां क्लबांतच कोणसें म्हणत होतें कीं, तुझी 'पूर्णचंद्रा' च्या नव्या अंकांतील गोष्ट फार चांगली होती म्हणून. काय बरं नांव घेतलंन् त्यानें ! राजवाडा छे: राजविलास–नव्हे—"

"राजद्रोह" दिवाकर हंसत म्हणाला.

"खरंच राजद्रोह. तुझ्यापाशीं अंक असला तर दे. आतांच वाचून काढीन."

"आपल्या लेखाचा अंक लेखकाजवळ कधींच असत नाहीं."

"बरं अंक नाहीं तर नाहीं. हें खादीचें पाकीटच दे मला प्रवासाला. तूं गोव्यांतून परत जाशील तेव्हां घेऊन जा."

" पण शालजोडीला ठिगळ लावल्यासारखें नाहीं का हें होणार ? "

" तुझ्या मनांत घायचं नाहीं असं दिसतंय झालं. सहज वाटलं बरं म्हणून म्हणालों. "

" मग जा कीं घेऊन. नको कोण म्हणतंय ? खादीचें पाकीटच काय, पण खादीचा पोषाख देखील मागशील तर काढून देतों. "

" नको बोवा. माझ्या देशभक्तीची तहान या पाकीटावरच भागेल. "

* * * *

मी व दिवाकर रात्रीं बरोबरच स्टेशनावर आलों. मेल यायला जरा अवकाश होता म्हणून आम्हीं इकडे तिकडे फिरत होतों. दिवाकर चिंताक्रांत दिसत होता. आपल्यावरून आपण जग ओळखतों असें असल्यामुळेंच कीं काय, दिवाकराच्या मनांत स्वतःच्या लग्नाचे विचार घोळत असावेत असें मला वाटलें. मी त्याच्या पाठीवर थाप मारून म्हटलें, " कुठल्या सुंदरीच्या चिंतनांत मग्न झाला आहेस रे ? धड बोलत देखील नाहींस. "

" सुंदरीचें चिंतन करायला तुझ्यासारखी मला फुरसद नाहीं बावा " दिवाकरानें उद्विग्न स्वरानें उत्तर दिलें.

" गोव्यांतून परत जातांना सांगलीला उतर हं. हें पाकीट ओलीसच ठेवून घेतलें आहे म्हणेनास, " मी बरोबर घेतलेल्या त्याच्या खादीच्या पाकीटाकडे बोट दाखवीत म्हणालों.

नदीच्या लोंढ्याप्रमाणें आलेली आगगाडी हां हां म्हणतां पुढें धांवूं लागली. मी त्या प्रवाहाबरोबर वाहत चाललों व दिवाकर तिरावरच राहिला. आज पांच वर्षांनीं दिवाकर आपल्याला उभाउभी भेटला. पुन्हां कधीं भेटेल कुणाला ठाऊक ! कदाचित् कधीं भेटणारहि नाहीं. मृत्यूच्या आगगाडींत बसून परलोकच्या प्रवासाला निघालेल्या मनुष्याला त्याचे आप्तेष्ट पुन्हां कोठें भेटतात ?

भावी पत्नी पहावयाला निघालेल्या माझ्या मनांत मरणाचे विचार आलेले पाहून माझें मलाच हसूं आलें. एकाच पृथ्वीवर अंधार व ऊन पाठशिवणीचा खेळ खेळत असतात. मंगल–अमंगल, आशा–निराशा वगैरे जोड्याहि मनुष्याच्या मनांत अशाच सारख्या लपंडावांत गुंग असतात. हां हां म्हणतां माझें मन भुसावळला मामाच्या घरीं गेलें. दोन तीन वर्षांपूर्वी मामाची मुलगी मी पाहिली होती. पण ती लग्नाला योग्य झाली असली, तरी मला योग्य नाहीं अशीच माझी समजूत झाली होती.

इतकें झालें तरी आई कांहीं केल्या आपला हट्ट सोडीना. ' मुलीचें रूप घेऊन काय चाटायचें आहे ? ' असेंहि ती रागानें म्हणाली. असहकारितेच्या चळवळींत दिवाकरानें कॉलेज व मी शाळा बरोबरच सोडली असल्यामुळें, लग्नविषयक स्वराज्य मिळविण्या-करतांहि तोच अनत्याचाराचा मार्ग स्वीकारावयाचें मी ठरविलें आणि लग्नाची गोष्टच सोडून दिली. आमच्या आईसाहेबांचें सैतानी सरकार लवकरच वठणीवर आलें. मी पुन्हां एकदां ती मुलगी पहावी व पसंत न पडल्यास दुसरी करावी, अशी सुधारणा माझ्या पदरांत पडली. हा पहाण्याचा फार्स करण्याकरितांच मी भुसावळला जात होतों.

चटकन् माझ्या मनांत एक विचार चमकून गेला. दिवाकराचें लग्न व्हायचेंच आहे. त्याच्यासारख्या खादीवाल्याला चांगली मुलगी मिळणें ही गोष्ट अन्नक्षेत्रांत जेवणाराची अत्तरगुलाबानें संभावना होण्याइतकीच शक्य होती. मामांची मुलगी कुणीकडून सौभाग्यवती झाल्याशीं कारण. हा नाहीं तर तो भाचा त्यांत त्यांचें काय मोठें बिघडणार आहे ? कोरांटीच्या फुलाला बाजारांत किंमत येत नाहीं; सुरंगीलाच येते. मुलींचेंहि तसेंच आहे. आपल्या अगदीं सामान्य मुलीला माझ्यासारखा श्रीमंत भाचा मिळावा ही मामांची इच्छा जितकी आपलपोटेपणाची तितकीच अव्यवहार्य होती. साधें घड्याळ राजानें आपल्या हातावर कां बांधावें ? भिकार कविता उत्तम मासिकानें कां छापावी ? अंगावर लक्तरें असणाऱ्या भिकाऱ्यानें फर्स्टक्लासमध्यें बसण्याची इच्छा कां धरावी ? तें कांहीं नाहीं. पांच वर्षें देशभक्ति करणाऱ्या दिवा-करालाच ती चांगली बायको शोभेल. बिचाऱ्याला देशापुढें कांहीं दिसत नाहीं; तेव्हां बायकोचें वाईट रूपहि कांहीं त्याच्या लक्षांत येण्याचा संभव नाहीं. वधू-सागरांतील हालाहल पचवायला त्याच्यासारखा दिगंबर मनुष्यच लायक.

* * * *

पुण्याला खादीचें पाकीट जवळच ठेवून मी खिडकीबाहेर पहात होतों. इतक्यांत आमच्या डब्यांत दोन माणसें—एक वृद्ध गृहस्थ व एक सतरा अठरा वर्षांची तरुणी—आलीं व माझ्या समोरच्याच बांकावर बसलीं. नकळत माझी दृष्टि त्या तरुणीकडे वळली. बाहेरच्या सूर्यप्रकाशापेक्षां तिच्या मुखावरील तेज अधिक मनोहर आहे असें मला वाटलें. गाडी सुटल्यावर बाहेरली झाडेंझुडपें बघत बसण्यापेक्षां वाऱ्याच्या झुळके-बरोबर खेळणाऱ्या तिच्या केसांचें नृत्य पाहणें निःसंशय आनंददायक होईल ही

कल्पनाहि माझ्या मनांत आली. तिचे डोळे मात्र मला पुरते दिसले नाहींत. कारण बांकावर बसल्याबरोबर ती कुठल्याशा मासिकाचा अंक वाचण्यांत गढून गेली. ‘ या मासिकांत माझा एकादा लेख असता तर काय बहार झाली असती ! ’ मी मनांत म्हटलें. आपल्या वाङ्मयप्रेमाचें प्रदर्शन व तिच्या मुखचंद्राचें दर्शन हे दोन्ही हेतु साधण्याकरतां मी विचारलें, “ कसलं आहे मासिक तें ? ”

मान वर न करतांच ती म्हणाली, “ पूर्णचंद्र. ”

ज्या लेखकाचा लेख ती वाचीत होती त्याचा मला अत्यंत राग आला ! पण त्याचें नांव देखील माहीत नसल्यामुळें त्याच्या नांवानें खडे फोडण्यासारखी साधी गोष्ट करणें सुद्धां मला शक्य नव्हतें. तिच्याकडे अधिक वेळ पहात राहणें आपल्या सभ्यपणाला व विशेषतः खादी पाकिटाला शोभणार नाहीं, या समजुतीनें मी पुन्हां खिडकीबाहेर पाहूं लागलों. चर्मचक्षु बाहेरचें उन्ह पहात होते; पण मनःचक्षु न दिसणाऱ्या चांदण्यांत रममाण झाले होते.

“ हें पाकीट तुमचेंच का ? ” त्या वृद्ध गृहस्थाचा प्रश्न कानीं पडतांच मी तोंड फिरविलें.

“ हो, माझेंच आहे तें. अडचण होत असेल तर इकडे बसा. मी तें खालीं ठेवतों.” ती तरुणी त्या पाकिटाकडे स्निग्ध दृष्टीनें पहात असलेली बघून मी म्हटलें. मात्र पाकीटाची जागा म्हातारेबोवांनीं घेण्यापेक्षां त्या तरुणीनेंच घ्यावी अशी मनांतल्या मनांत मी देवाला विनवणीहि करीत होतों.

“ तशी अडचण नाहीं कांहीं पण—”

माझ्या अंगावरील परदेशी कपडे व तें खादीचें पाकीट यांचा मेळ कसा बसवायचा हा प्रश्न त्यांना पडला असावा ! “ पाकीट खादीचें असून पोषाख तसा कां नाहीं अशी शंका आली वाटतें तुम्हांला ? पण करणार काय ? ऐनवेळीं स्टेशनावर माझे खादीचे कपडे, एका मित्राला द्यावे लागले. कुठल्याशा सभेचें अध्यक्षस्थान त्याला मंडित करावयाचें होतें.” मी धडधडीत थाप मारली. थाप मारल्यावांचून जगांत साध्या मृदंगाकडून देखील साथ मिळत नाहीं. मग या सुंदरीकडून—

“ योगायोगानेंच आपली गांठ पडली म्हणावयाची,” गुलाबाच्या कळीसारखे दिसणारे ओंठ अर्धविकसित गुलाबासारखे करीत ती म्हणाली.

“ जन्माच्या गांठीसुद्धां जिथं योगायोगानें पडतात तिथं—”

" तुमच्यावर भारी प्रेम आहे पहा आमच्या मनीचं," माझ्या समोरील भीष्माचार्य उद्गारले. मी चकितच होऊन गेलों ! माझ्या पत्रिकेंतले सर्व अनुकूल ग्रह आजच जागे झाले कीं काय हें मला कळेना !

" कधीं पाहिलं नाहीं पण मी यांना."

" पहायलाच कशाला पाहिजे ? अहो, प्रेम नेहमींच आंधळें असतें ! " मनीचे वडील, चुलते, मामा अगर आजोबा यांपैकीं एका नात्यावर हक्क असण्याचा संभव असलेले वृद्ध गृहस्थ म्हणाले.

" किती छान आहे ही गोष्ट," मनी म्हणाली.

" कोणती ? "

" ही ' राजद्रोह '–डब्यांत आलें तेव्हां तीच मी वाचत होतें. "

आतां माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. ही पोरगी गोष्टी लिहिणाऱ्या दिवाकरावर खूष झाली असून, पाकीटावरच्या नांवामुळें मीच दिवाकर अशी तिची समजूत झाली होती. हें तोतयाचें बंड चालू ठेवावें कीं काय या विचारांत मी असतांनाच त्या वृद्ध गृहस्थांनीं प्रश्नमालिकेला सुरवात केली,

" कुठं जात आहां ! "

" भुसावळला "

" व्याख्यान बिख्यान आहे वाटतें ? "

नाहीं म्हणणें जीवावर येऊं लागलें. व्याख्यान व लेख यांच्यावर फिदा असणाऱ्या सुंदरीपुढें मला व्याख्यान देतां येत नाहीं म्हणून कबूल करायचें ? छीः, वचने किं दरिद्रता ? हाच जगाचा न्याय. मी व्याख्यानाच्या प्रश्नाला होकारार्थी मान हालविली.

' फळें असलेल्या वृक्षांकडेच पक्षी धांव घेतात,' मनूताई अभिनंदनपर मुद्रेनें म्हणाल्या.

देवाला वाहण्यासाठीं दिलेलीं फुलें घेऊन पुजाऱ्यानें मधल्यामधेंच त्यांचा वास घ्यावा त्याप्रमाणें ही स्तुति दिवाकराची आहे हें कळत असूनहि मला तिच्या बोलण्यानें आनंद झाला.

" पण लिहिण्यांत भलतं साहस आपण करूं नये. " मनूताई सद्गदित स्वरानें म्हणाली.

उभ्या जन्मांत एक अक्षरहि न लिहिणाऱ्या माझ्यासारख्या प्राण्याच्या अंगांत एकदम आगरकरांचा संचार झाला व मी म्हटलें, " सत्य असेल तेंच लिहायचें हा तर माझा बाणा आहे."

" या ' राजद्रोह ' गोष्टीबद्दलची कुणकुण तुमच्या कानांवर आली असेलच." राजद्रोह ही गोष्टच ज्या बहाद्दरानें पाहिली नव्हती त्याला तिच्याबद्दची कुणकुण कुठून कळणार ? मी स्तब्धच राहिलों.

" या गोष्टीबद्दल लेखकावर खटला करण्याचा सरकारचा विचार आहे असें कालच पुण्यांत ऐकलें." मनीच्या पालकांनीं कुणकुणीचे स्पष्टीकरण केलें. गोष्ट दिवाकरानें लिहिली आहे, सरकार चोर सोडून कांहीं संन्याशाला सुळीं देणार नाहीं असा पोक्त विचार करून मी म्हटलें, "करीना सरकार खुशाल लेखकावर खटला ! राष्ट्रयज्ञांत अनेकांच्या आहुति पडाव्या लागतात. तेव्हांच कुठें स्वातंत्र्यदेवता प्रसन्न होऊन इच्छित वर देते. "

" किती निधडी छाती आहे आपली, " माझ्याकडे कौतुकानें पाहत मनूताई म्हणाली. दुरून डोंगर साजरे हेंच खरें ! तिनें जर त्यावेळीं माझ्या छातीला हात लावून पाहिला असता तर——

मनूताईच्या फराळाच्या डब्यांत अस्मादिकांची स्वारी भागीदार झाली. भुसावळचें व्याख्यान कधीं आहे असा तिनें प्रश्न करतांच तें कधींहि न होणारें व्याख्यान ' उद्यां ' ठरविण्यापेक्षां पुढल्या आठवड्यांत ठरविणें बरें असा विचार करून मी तिला तसें उत्तर दिलें. अर्थात् तिनें व तिच्या वडिलांनीं नाशिकला आपल्या घरीं उतरून जाण्याचा मला आग्रह करावा हें स्वाभाविकच होतें. या सुंदर तरुणीचा सहवास सोडून मामेबहिणीचें दर्शन घ्यायला उतावीळ होण्याइतका कांहीं मी वेडा नव्हतों. चार दोन दिवसांच्या सहवासांत या अल्लड पोरीचें प्रेम काल्पनिक गोष्टीवरून पैशाच्या गोष्टींकडे वळवितां आलें तर आपलें वधूपरीक्षेचें काम नाशिकलाच यशस्वी होईल अशी अंधुक आशाहि माझ्या मनांत उत्पन्न झाली. आई रागावलीच तर गोदेचें स्नान करायला उतरलों होतों म्हणून सांगितलें म्हणजे झालें.

* * *

दिवाकर पंडिताच्या गोष्टीचें वेड सोडून दिलें, तर मनूताईत नांव ठेवण्यासारखें दुसरें कांहींच नव्हतें. सूर्यापुढें चंद्र निस्तेज पडतो हा नित्याचा अनुभव तिचा

चेहरा पाहतांच खोटा वाटूं लागे; कारण नेत्रांच्या रूपानें दोन तेजस्वी सूर्य सारखे प्रकाशत असतांनाहि तिचा मुखचंद्र नेहमीं प्रफुल्लितच दिसत असे. अंगकांति सोन-चांफ्यासारखी तर हृदय जाईजुईप्रमाणें. ‘ बायको मिळावी तर अशी, ’ हा विचार नाशिकांत पाऊल टाकल्यापासून एकसारखा माझ्या मनांत घोळत होता. बिचाऱ्या मनुताईला माझ्या मनांतील या वादळाची दादहि नसावी. मला काय आवडतें, काय आवडत नाहीं, याची चौकशी करतांना देखील ती ‘ राजद्रोहा ’ सारख्या गोष्टींचेच आधार देत होती. ‘ तुम्ही नेहमींच कडक लिहितां; तेव्हां तुम्हांला चहा स्ट्रॉंगच लागत असेल, ’ ‘ जहाल माणसांना तिखटामिठाचे पदार्थ अधिक आवडत असले पाहिजेत. नाहीं ? ’ वगैरे तिचीं वाक्यें ऐकून तोंडावर लटकें हंसूं आणतां आणतां मला पुरेवाट झाली. ‘ राजद्रोह गोष्टीचा शेवट फार चांगला झाला आहे ’ हे तिचे शब्द ऐकतांच ‘ माझ्या या नाटकाचा शेवट तसाच झाला म्हणजे सुटलों, ’ असे उद्गार मी मनांतल्या मनांत काढले.

प्रख्यात कथालेखक दिवाकर पंडित नाशिकांत आल्याची बातमी लागतांच बरेच नवशिके लेखक आपल्या गोष्टींचीं बाडें घेऊन माझ्यावर चाल करून आले. एकानें कुठल्या साधूच्या प्रसादामुळें तुम्हांला इतक्या चांगल्या गोष्टी लिहितां येतात असा सवाल केला. दुसऱ्यानें आपली अत्यंत परिणामकारक गोष्ट वाचून दाखविली. त्या गोष्टींत एकंदर पांच पात्रें असून दोन खून व तीन आत्महत्या होत्या. मनुताईच्या मधुर शब्दांऐवजीं वाङ्मयांतल्या घिसाड्यांच्या हातोड्यांचे आवाज ऐकणें माझ्या अगदीं जीवावर आलें. पण करणार काय ? ‘ चणे खावे लोखंडाचे । तेव्हां देवपदीं नाचे ’ हा अनुभव बडा लेखक झाल्यावर घेतलाच पाहिजे.

सरस्वतीदेवीला दे माय धरणी ठाय करून सोडणाऱ्या या वाङ्मयसेवकांना पुढील आठवड्यांत माझें भुसावळला व्याख्यान असल्याचें कळलें. भुतांच्या हातांत कोलीत मिळालें. ‘ नाशिककरांना आपल्या व्याख्यानगंगेंत स्नान करण्याची संधि आपण दिलीच पाहिजे ’ अशा अलंकारिक भाषणांचा माझ्यावर वर्षाव झाला. मनुताईनेंहि या वाङ्मयसेवकांची बाजू उचलून धरली. होय नाहीं म्हणतां म्हणतां ‘ परवां व्याख्यान ठरवा ’ असे शब्द नकळत माझ्या तोंडांतून निघूनहि गेले.

मनुताईसमोर फटफजिती होऊं नये म्हणून व्याख्यान देण्याचें कबूल केलें खरें ! पण रात्रीं अंथरुणावर पडतांच सभेचें चित्र डोळ्यांपुढें उभें राहून मला भेवडावूं लागलें. जन्माला येऊन ज्यानें चार गोष्टी वाचल्या देखील नव्हत्या त्यानें ‘ अर्वाचीन कथा-

वाङ्मय ' या विषयावर बोलायचें ! आयत्या वेळीं आजारी पडल्यावांचून या पेंचातून सुटका होणार नाहीं हें स्पष्ट दिसत होतें. कोणत्या आजारानें आजारी पडणें अधिक चांगलें याचा विचार करीत मी ती रात्र जागून काढली.

* * * *

फांशीची शिक्षा झालेल्या इसमाप्रमाणें दुसरा दिवस मी अस्वस्थ चित्तानें काढला. दिवाकराच्या खादीच्या पाकिटाची आशा सोडून परस्पर भुसावळला पळून जावें असा विचार पदोपदीं मनांत येत होता. मी दुसरे दिवशींच्या व्याख्यानाची तयारी करीत आहे असें वाटून मनुताईनेंहि माझ्या अस्वस्थतेचें कारण विचारलें नाहीं. त्या दिवशीं रात्रीं तर काळजीनें माझा डोळ्याला डोळा लागला नाहीं.

उजाडतांच, माझी प्रकृति बरी नाहीं, तेव्हां व्याख्यानाचा बेत रद्द करावा असें मी मनुताईला सुचविलें. सर्वांचा विरस करणारी ही गोष्ट कबूल करणें कठीण वाटूं लागल्यामुळें तिनें सर्व वाङ्मयसेवकांना बोलावणें धाडलें. त्यांनीं तत्काळ येऊन मला वेढा दिला व ' डॉक्टरकडून इंजेक्शन देऊं या पाहिजे तर, ' ' आपण पांच मिनिटें बोललां तरी हरकत नाहीं,' ' आपल्या गोष्टीवर लोक इतके खूष आहेत कीं दिवाकर पंडित त्यांना पहायला मिळाले म्हणजे बस्स आहे.' वगैरे अस्त्रें माझ्या-वर सोडलीं.

या वाक्यांपैकीं शेवटचें पुरें होतें न होतें तोंच ' दिवाकर पंडित घरीं आहेत काय ? ' असा प्रश्न व ' हो, आहेत ' हें त्याचें उत्तर माझ्या कानांवर पडलें. दिवा-कराचा एखादा स्नेही तर भेटायला आला नाहींना असें वाटून बिंग फुटण्याच्या भीतीनें मी गारठून गेलों. इतक्यांत भयभीत चेहऱ्यानें मनुताईचे वडील एका पोलिस अंमलदाराला घेऊन आंत आले. त्यांच्या पाठोपाठ मनुताईही आली. तिच्या कडे पाहिलें तों तिचा चेहरा अगदीं उतरून गेला होता. तिच्या वडिलांनीं माझ्या-कडे बोट दाखवितांच अंमलदार म्हणाले, " पंडित, तुम्हांला पकडण्यासाठीं मी आलों आहें," माझें डोकें गरगर फिरूं लागलें. ते अधिकारी पुढें म्हणाले, "तुमच्या-सारख्या चांगल्या लेखकाला असें वागविणें माझ्या जीवावर येतें आहे. क्षमा करा."

" कशाबद्दल पकडणार आहांत मला ? " मी धीर करून विचारलें.

"तुमची 'राजद्रोह' ही गोष्ट सरकारनें राजद्रोही ठरविली आहे. तुम्हांला पकडण्या-साठीं सगळीकडे हुकूम सुटले आहेत. पण चार दिवसांत पुण्या-मुंबईला कुठेंच तुमचा पत्ता लागला नाहीं. ही अप्रिय कामगिरी करण्याची पाळी माझ्यावर आली

याबद्दल मला फार वाईट वाटतें. ” अंमलदार समंजस दिसला. पण तुरुंगाची भीति डोळ्यांपुढें नाचूं लागली. भुसावळला चतुर्भुज होण्यासाठीं घरून निघालों तो नाशिकला दुसऱ्या अर्थानें चतुर्भुज होणार या कल्पनेनें माझें धाबें दणाणून गेलें. मनुताईची मलूल मुद्रा, लेखकांचे आश्चर्यचकित चेहरे या सर्वांकडे दुर्लक्ष करून मी म्हटलें, ‘ साहेब, ही गोष्ट मी लिहिलीच नाहीं. ’ शिक्षेच्या भीतीनें दिवाकर पंडिताचें माथें फिरलें असेंच सर्वांना वाटलें.

“ पण गोष्टीवर तर तुमचेंच नांव आहे, ” अंमलदारानें प्रश्न केला.

“ तें नांवच माझें नव्हे. दिवाकर पंडिताचें फक्त पाकीट माझ्यापाशीं आहे. तो गेलाय गोव्यांत ! माझी ओळख पटायला पाहिजे असेल तर भुसावळला आतांच तार करा. ” मी मामांचा पत्ता टिपून दिला. मी मजकूर लिहिल्यास संशय उत्पन्न व्हॉयचा म्हणून साहेबांनींच तो लिहिला. वाटेल तें करून मामांनीं यावें म्हणून ‘ आपले भावी जांवई बाबुराव पोलिसच्या ताब्यांत आहेत. तत्काळ निघून या ’ अशा अर्थाची तार मी करवली.

* * * *

दिवाकर तुरुंगांतून एका वर्षानें सुटला. त्यानंतर लवकरच ‘ नाशिकला माझें लग्न होणार आहे. देवक तूं व सौ. वयनी यांनीं ठेवावें अशी माझी फार इच्छा आहे. सौ. वयनींवर माझा आतेभाऊ या नात्यानेंहि हक्क आहे ’ असें त्याचें पत्र आलें. पण चतुर्भुज करण्याचा नाशिकच्या हवेचा गुण लक्षांत घेऊन मी त्याला नकार दिला.

१९२९

# माहेरचीं भुतें

अरुणाचा हात धरणारा चित्रकार गोमंतकांतील तरुण पिढींत दुसरा कोणी नव्हता. पण रजनीचें पाणिग्रहण करतांना आपल्या हृदय-फलकावर आशादेवीनें काढलेलीं चित्रें आपल्याला कधींहि रंगवून दाखवितां येणार नाहींत असें त्याला वाटलें. वद्य अष्टमीचा रम्य चंद्रोदय त्यानें पाहिला होता. पृथ्वीनें पांघरलेली धुक्याची चादर दूर करून आपल्या स्निग्ध स्पर्शानें तिला जागृत करणारा सूर्योदय त्यानें अनिमिष नेत्रांनीं अवलोकन केला होता, पण तो व रजनी यांच्यामधील अंतरपाट दूर झाला तेव्हांचा आनंद कांहीं निराळाच होता. डोळे व हृदय यांत जमीनअस्मानाचें अंतर असतें असें अरुणाला वाटूं लागलें. वनश्रीचीं चित्रें काढण्याकरतां तो वनांत गेला म्हणजे घटका नि घटका निर्झराचें संगीत ऐकत वसत असे. वसंतांतील कोकिळेचे मुग्ध व उन्मादक सूर काळोख्या रात्रीं भोंवतालीं अंधार दाटला असतांना त्यांत चंद्रकिरणांप्रमाणें उदय पावणारे त्याच्या दिलरुब्याचे मधुर स्वर, बालकाच्या अर्थहीन परंतु रम्य बोलांप्रमाणें वाटणारें निर्झर-संगीत हीं सर्व रजनीच्या कंकण-रवाच्या मानानें कर्कश आहेत अशी त्याची खात्री झाली. त्यानें रजनीकडे पाहिलें. ती चोरट्या नजरेनें त्याच्याकडे पहात होती. बोहल्यावरून धांवत जाऊन कागद आणावा व तिचें रेखाचित्र काढावें अशी उत्कट इच्छा त्याच्या मनांत उत्पन्न झाली. नकळत पाणिग्रहणाकरितां पुढें केलेला हात त्यानें मागे घेतला देखील. त्याबरोबर पुरोहित ओरडले, " आतां हात मागं घेऊन चालणार नाहीं हो. हा हात आतां जन्मभर हातांत घेतला पाहिजे. "

" जन्मभर कां ? जन्मोजन्मीं देखील. " अरुणाचे हे शब्द ऐकतांच रज-नीनें मंद परंतु मधुर स्मित केलें. आपल्या आवडत्या वेलीवर पहिली कळी दिसावी तसा आनंद अरुणाला झाला. लग्न गोरज मुहूर्तावर लागल्यामुळें मंडपाबाहेर काळोख पडत होता. पण अरुणाच्या आयुष्यांत सूर्योदय होत होता.

लग्नसमारंभांत अरुण एखाद्या कळसूत्री बाहुल्याप्रमाणें वागला. पंचपक्वान्नांनीं भरलेलें ताट पुढें असूनहि त्याचें लक्ष दुसरीकडेच कुठें तरी असे.

" काय अरुण, आज पोटांत कावळे ओरडत नाहींत वाटतं ? " एका स्नेह्यानें म्हटलें.

" कोकिळा गाऊं लागल्यावर कावळ्यांच्या कावकावीकडे लक्ष देतो कोण ? " असें उत्तर अरुणाच्या अगदीं जिभेवर आलें.

" अरे अरुण, असा वेड्यासारखा पाटावर काय बसला आहेस माशा मारीत ? लाडवांचा कांहीं समाचार बिमाचार घेशील कीं नाहीं ? "

" अमृत मिळाल्यावर पाण्याकडे कोण ढुंकून बघेल ? " अरुणाला उत्तर सुचलें पण तो स्तब्धच बसला.

" आतां अरुण कांहीं हातांत पेन्सिल धरीत नाहीं. तिची सवत आली ना घरांत ? " तिसऱ्यानें टीका केली.

" दोन हात होते तेव्हां इतकीं चित्रें काढलीं ! मग चार हात झाल्यावर चित्रें कमी निघतील कीं जास्ती ? " अरुणानें मोठ्या दिमाखानें उत्तर दिलें.

" बाबा रे, सारींच त्रैराशिकं सम नसतात. आयुष्याच्या अंकगणितांतील लग्न हें व्यस्त त्रैराशिक आहे. "

लग्नाला व्यस्त त्रैराशिक म्हणणारा मित्र अरुणाला अरसिक वाटला. रजनी आकाशांतलीं अदृश्य नक्षत्रें व्यक्त करते. आपली रजनी आपल्या हृदयांतील अव्यक्त चित्रांना मूर्त रूप देईल. लग्न म्हणजे व्यस्त त्रैराशिक ! किती रुक्ष कल्पना ही ! लग्न हा जिवाशिवाचा संगम आहे. एकलकोंडा पुरुष लोखंडा-सारखा नुसता उपयुक्त असतो ! पत्नीच्या परिसाचा स्पर्श होतांच त्याचें सोनें होतें. अरण्यांतलीं सारीं झाडें तालतमालासारखीं असलीं तर ऋषींच्या देव-पूजेला फुलें कुठून मिळतील ? पुरुष जळाऊ लांकडासारखा नुसता उपयोगी ! स्त्री मात्र द्राक्षाच्या व जाईच्या वेलीप्रमाणें जीवनांत रस व सुगंध यांची वृष्टि करते. पुरुष वाटेल त्या आपत्तीला तोंड द्यायला तयार होईल; पण त्याला पत्नीचें पाठबळ पाहिजे. रमणी कटाक्षानें जी स्फूर्ति देते ती हजारों उपदेशपर ग्रंथ वाचूनहि मिळ-णार नाहीं. तिची हास्यगंगा प्रसन्न व्हावी म्हणून पुरुष भगीरथ प्रयत्न करील. तिचें अधरामृत लाभावें म्हणून पुरुष पर्वतप्राय अडचणी व विषारी विरोध यांना

खेळण्यांप्रमाणें मानून संसारसागराचें मंथन करील. तिचा वात्सल्यानें भरलेला हात अंगावरून फिरावा म्हणून तो आगींतून चालत जायलाहि तयार होईल.

आंधळ्याला दृष्टि यावी, अरसिकाला काव्यशक्ति प्राप्त व्हावी अगर रंकाला कुबेराची संपत्ति मिळावी तशी रजनी आपल्याला लाभली आहे असें अरुणाला वाटत होतें. तिची मूर्ति घडवितांना ब्रह्मदेवानें रतीला पुढें बसविली असावी. सृष्टींतील अरुणाचें आयुष्य अल्पावधीचें असलें तरी तिच्या गालांवर अष्टौप्रहर अरुण खेळत असे. तिच्या दोन्ही डोळ्यांत येऊन बसलेल्या चांदण्यांना सृष्टींतील अस्ताचा नियम लागू नव्हता. अर्धस्फुट गुलाबकलीकेप्रमाणें भासणारें तिचें हास्य विकासाच्या निसर्गनियमांना झुगारून देऊन तसेंच अर्धस्फुट राहिलें होतें. रजनीचा लाभ होण्यापूर्वी आपण काढलेलीं चित्रें अतिशय सुंदर ठरलीं, मग आतां जीं चित्रें आपल्या हातून बाहेर पडतील तीं लोकांना अद्भुतरम्यच वाटतील यांत शंका नाहीं. आपलें व रजनीचें लग्न म्हणजे आशा व आनंद यांचा विवाहच म्हटला पाहिजे ! कितीतरी विचार अरुणाच्या मनांत नाचूं लागले.

अरुण रजनीला घेऊन आपल्या घरीं जाण्याला निघाला. रजनी ' आक्का, येतें हं ' ' ताई, येतें हं ' ' दादा, येतें हं ' असें घोगऱ्या आवाजानें डोळे पुशीत पुशीत म्हणूं लागली, तेव्हां अरुणाला अगदीं भडभडून आलें. आज सतरा अठरा वर्षें एका भूमींत वाढलेली ही फुलवेल आपण आपल्या घरच्या कुंडींत नेऊन लावीत आहों, या स्थित्यंतरामुळें ही वेल सुकून तर जाणार नाहीं ना ? सतराअठरा पावसाळे ज्याच्या प्रेमळ छायेखालीं रजनीनें काढले तें हें घर सोडून जातांना तिच्या मनाला किती वाईट वाटत असेल ! लग्न म्हणजे मुलीचा एक प्रकारचा मृत्युच नाहीं का ? सासरीं होणारा पुनर्जन्म आधीं व माहेरीं घडणारा मृत्यु नंतर, अशी उलटापालट या मृत्यूमध्यें होत असली तरी या वेळीं मुलीचें हृदय व्याकुळ झाल्यावांचून कसें राहील ? वर्ष दोन वर्षें परदेशांत शिक्षणाकरतां जायचें असेल तर मनाला किती वाईट वाटतें, मग जिथें रजनी लहानाची मोठी झाली, जिथें ती आपल्या भावंडांबरोबर खेळली, जिथल्या कणाकणांशीं तिचें अंतःकरण एकरूप झालें आहे तें घर सोडतांना तिच्या जिवाला किती वेदना होत असतील ? आपण बिऱ्हाड बदललें त्या वेळीं मांजर पोत्यांत घालून नव्या बिऱ्हाडीं नेलें, पण तें दुसऱ्याच दिवशीं जुन्या घराकडे पळून गेलें ही गोष्ट अरुणाला आठवली. आपण रजनीशीं लग्न करून तिला या दुःखांत घातलें, असाहि विचित्र विचार त्याच्या

मनांत येऊन गेला. दुसऱ्याच क्षणीं त्याची कलादृष्टि जागृत झाली. माहेरचा प्रथमतःच निरोप घेऊन सासरीं जायला निघालेल्या नववधूचें करुणरम्य चित्र त्याची कल्पना रंगवूं लागली.

*    *    *    *

मंगेशाच्या देवळाजवळच्या भव्य व सुंदर तळीवर अरुण आपलें चित्र पहात बसला होता. चित्राचें नांव ' सूर्यास्त कीं सूर्योदय ? ' असें त्यानें ठेवलें होतें. चित्राचे दोन भाग असून एका भागांत मावळणारा सूर्य, पर्वतावरून धडाधड उड्या टाकणारी नदी, वेलीवरून गळून पडणारें फूल, आणि सासरीं जाण्याकरतां निघालेली व वृद्ध आईचा निरोप घेणारी एक नववधू यांचा संगम झाला होता. दुसऱ्या भागांत तोच सूर्य उदय पावलेला, तीच नदी समुद्राला मिळालेली, तेंच फूल देवाच्या मूर्तीवर वाहिलेलें व तीच नववधू पतीकडे सलज्ज दृष्टीनें पहात असलेली त्यानें दाखविली होती. महिन्यापूर्वी रजनी माहेरीं गेल्यापासून तों आज रजनी परत येईपर्यंत तो एकसारखा या चित्रांत गुंग होऊन गेला होता. मंगेशाच्या देवालयाच्या सभोंवार पसरलेल्या सृष्टिसौंदर्याचें आकंठ पान करावें व त्या सौंदर्यमदिरेच्या धुंदींत चित्र पुरें करायला बसावें असा त्याचा नित्यक्रम होता. माहेरीं जातांना ' आल्याबरोबर मला डायमंड तासाचीं सोन्याचीं कांकणं करायचीं हं !' असें रजनी बजावून गेली होती. जवळच्याच एका नायकिणीनें आपली सुंदर तसबीर काढण्याबद्दल त्याला तीनशें रुपये देऊंहि केले होते. पण कांहीं केल्या अरुणाचें मन त्या नायकिणीची तसबीर काढण्याकडे वळेना. रजनी प्रथमतः सासरीं यायला निघाली तेव्हां शाकुंतलांतील चवथा अंक आठवून जें करुणमनोहर चित्र त्याच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें होतें तें आपल्या कलेनें सजीव करण्याकरितां त्याची तळमळ चालली होती. तीनशें रुपयांचें काम दूर लोटून त्यानें ' सूर्यास्त कीं सूर्योदय ' हेंच चित्र काढावयाला सुरवात केली. पहिला भाग पुरा झाला तेव्हां त्यांतील वधूचा चेहरा हुबेहुब रजनीसारखा उतरला आहे हें त्याच्या लक्षांत आलें. ' सोन्याच्या कांकणांपेक्षां स्वतःच्या या प्रतिमेचेंच रजनीला अधिक कौतुक वाटेल ' अशी स्वतःच्या मनाची समजूत घालीत त्यानें तें चित्र पुरें केलें.

पण अभ्रांनीं मोहर जळून जावा त्याप्रमाणें रजनीच्या पहिल्याच शब्दांनीं त्याची आशा भग्न झाली. ' कुठं आहेत कांकणं ? ' तिनें येतांच प्रश्न केला. अरुणानें उत्तर न देतां तिला आपल्या खोलींत नेलें व चित्राकडे बोट दाखविलें. रजनी

मारी. पाण्यांत जो रंग टाकावा त्या रंगाचें पाणी होतें ! बायकांचें मन पाण्यासारखें
असतें, या समजुतीनें रजनी आपल्याशीं समरस होईल अशी अरुण अपेक्षा करीत

केतकीचा हाता तोडायला जावें आणि नाग डसावा अशांतला अरुणाचा प्रकार झाला, ‘ कसं बाई इतकं चांगलं चित्र आपल्याला काढतां येतं ’ असें रजनी कौतुकानें म्हणेल, आपला हात लाडकेपणानें हातांत घेईल, ‘ दृष्ट लागेल माझ्या या हाताला ’ असें लडिवाळपणानें बोलत ती आपल्या हाताचें चुंबन घेईल, एक ना दोन, अनेक मनोराज्यें अरुणानें उभारलीं होतीं. रजनीच्या स्नेहशून्य शब्दांनीं त्याचीं हीं सर्व राज्यें धुळीला मिळालीं. पुरें झालेलें चित्र हातांत घेऊन तो मंगेशाच्या तळीवर जाऊन बसला.

रजनी सुरूप आहे, थोडेंफार शिकलेली आहे, हुषार आहे या साऱ्या गोष्टी अरुणानें व त्याच्या आईनें पाहिल्या तेव्हांच त्यांनीं लग्न ठरविलें. आपला संसार आतां एखाद्या सुंदर चित्रासारखा होईल असें अरुणाला वाटूं लागलें; पण प्रत्यक्ष लग्नानंतर त्यानें अपेक्षा केल्याप्रमाणें गोष्टी घडून येईनात. त्याची चित्रसमाधि सासूविरुद्ध रजनी करीत असलेल्या कागाळ्यांनीं भंग पावूं लागली. पहांटे उठून सूर्योदय पहाण्याकरितां तो जवळच्या टेंकडीवर जाऊन बसला कीं घरीं परत यायचें त्याला भानहि रहात नसे. त्याला उशीर झाला कीं रजनीच्या अंगचा तिळपापड होई. माणसानं “ तिष्ठायचं तरी मेलं किती चहासाठीं ? ” ती चरफडत म्हणे.

“ सूर्योदय पहात बसलों होतों ग जरा. ”

“ सूर्योदय पाहिला म्हणून चहाची तलफ भागत नाहीं कांहीं ! ” रजनी टोमणा मारी. पाण्यांत जो रंग टाकावा त्या रंगाचें पाणी होतें ! बायकांचें मन पाण्यासारखें असतें, या समजुतीनें रजनी आपल्याशीं समरस होईल अशी अरुण अपेक्षा करीत होता ! पण आज त्याच्या अत्यंत सुंदर चित्राविषयीं तिनें दाखविलेला उदासीनपणा पाहून त्याची पूर्ण निराशा झाली. गवयानें बहिऱ्या राजाकडे आश्रय मागायला जाण्यांत फायदा काय ?

“ अरुण चित्रकार ते तुम्हीच का हो ? ” तळीच्या पायऱ्या उतरीत उतरीत कुणीसा प्रश्न केला. अरुणानें चित्रावर लावलेली दृष्टि वर केली व प्रश्न करणाऱ्या व्यक्तीकडे पाहिलें. चापूनचोपून बसविलेले केंस, डांबराच्या रस्त्यावरून काढलेल्या चुन्याच्या रेघेप्रमाणें दिसणारा भांग, ओपन कॉलरचा शर्ट, विड्यानें रंगलेले व सिगारेटनें सुशोभित झालेले ओठ इत्यादि गोष्टी चटकन् अरुणाच्या लक्षांत आल्या. त्या

व्यक्तीशीं बोलूं देखील नये इतका तिचा त्याला तिटकारा वाटूं लागला. खरें सौंदर्य फुलाच्या सुवासाप्रमाणें, तर रंगेलपणा अत्तराप्रमाणें असतो. पहिल्याचा कधींहि कंटाळा येत नाहीं. दुसरें प्रमाणाबाहेर झालें कीं त्याची शिसारींच बसते. ती व्यक्ति अरुणाच्या जवळ येऊन म्हणाली, " काय करतां हो चित्रकार इथं तळीवर बसून? जीवबिव द्यायचा बेत नाहीं ना?" याचे गाल रंगवून आपलें चित्रकलापटुत्व याच्या प्रत्ययाला आणून द्यावें असा रागाचा विचार अरुणाच्या मनांत चमकून गेला. इतक्यांत त्या व्यक्तीची दृष्टि त्याच्या हातांतील चित्राकडे गेली. " कसलं हो चित्र आहे तें? डोंगर, नदी, फूल, सूर्य नि ही कोण म्हातारी बाई? शी! अहो, म्हाताऱ्या बायकांचा उपयोग स्वयंपाकाला! चित्रांत त्यांचं काय काम आहे? काय मिळेल तुम्हांला या चित्राबद्दल?"

" काय मिळायचं तें आधींच मिळालं आहे."

" चित्र विकण्याच्या आधींच!"

" हो, चित्र काढतांना जो आनंद होतो त्याच्या पासंगालादेखील पैशाचा आनंद लागणार नाहीं."

" असलं चित्र विकत घ्यायला बसलाय् कोण म्हणा! जाऊं द्या तें. मी आलों होतों तुमच्याकडे एका कामाकरतां. पणजीला आम्ही एक नवी नाटक मंडळी काढली आहे. तिचे पडदे रंगवायला येतां कां? बोला. वर्षाचा करार. दरमहा दीडशें रुपये देऊं."

" ऊं हूं!" अरुण म्हणाला.

" पावणेदोनशें!"

" कलेचा लिलाव होत नाहीं!"

" पहा, सोन्यासारखी संधि आली आहे. मी आतां तुमच्या बिऱ्हाडीं गेलों होतों. दीडशेंची नोकरी आली आहे हें ऐकतांच तुमच्या कुटुंबाला काय आनंद झाला म्हणून सांगूं?"

अरुणाच्या अंगाची आग होऊं लागली. " तुम्ही जगाचं राज्य दिलंत तरी मी तुमचे पडदे रंगवायला येणार नाहीं." त्यानें निक्षून सांगितलें.

" दैव देतं नि कर्म नेतं. आळशावर गंगा आली तरी—"

" तुमच्या या गंगेंत जीव देण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं!"

* * * *

खिन्न अंतःकरणानें अरुण बिऱ्हाडीं आला. ‘खऱ्या कलेचें कौतुक जगांत कधींच होत नाहीं का?’ त्याच्या मनांत हा एकच प्रश्न एकसारखा थैमान घालीत होता. पैशापेक्षां, पोटापेक्षां श्रेष्ठ असें जगांत दुसरें कांहींच नाहीं काय? भडकपणाला भुलून जाण्याइतकें जग नेहमींच बाल्यावस्थेंत राहणार काय? सागरपृष्ठावरील लहरींचें नर्तन, संध्याकाळीं आकाशांत मेघाचें क्षणोंक्षणीं होणारें रूपपरिवर्तन, वनश्रीला पुलकित करणाऱ्या निर्झरांचें गायन या साऱ्या गोष्टी जगाला निरर्थक व निरुपयोगीच वाटतात काय?

जेवण झाल्यावर किती तरी वेळ अरुण डोकें घट्ट धरून बसला होता. सारी सृष्टि एखाद्या राक्षसी यंत्राप्रमाणें आहे असें त्याला वाटत होतें. टोळधाडींत पिकें उध्वस्त होऊन जातात; तिचा दगडांवर कांहींच परिणाम होत नाहीं. त्याप्रमाणें या हृदयविन्मुख जगांत सहृदय लोक झुरत बसतात; हृदयहीन मजा मारतात. विषण्ण मनाला थोडासा विरंगुळा मिळावा म्हणून त्यानें रजनीला हांक मारली. आपल्या आवडत्या बालकवीच्या कविता वाचायला तो तिला सांगणार होता.

“रजनी पालखीला गेली आहे देवाच्या.” आईनें उत्तर दिलें. ‘काय हवं तुला?’

“कांहीं नको.”

“बाळ अरुण, बोलायचं अगदीं जिवावर येतें आहे; पण—”

“काय तें सांग आई मला.” अरुण जड स्वरानें म्हणाला.

“तुम्हां नवराबायकोंत वितुष्ट आणण्याची माझी इच्छा नाहीं. पण बाबा बायको थोडी तरी धाकांत असूं दे तुझ्या. कांटा वेळेवर काढून टाकला म्हणजे त्याचा नायटा होत नाहीं.”

“पण झालं तरी काय असं, आई?”

“खोटी चुगली करीन तर देवाच्या घरीं मी पापी ठरेन. संध्याकाळीं नाटकमंडळींतला कोणसा आला होता ना तो तुझ्याकडे? ही दारांतच होती तेव्हां. काय काम होतं हें विचारलंन्, तूं कुठं आहेस तें सांगितलंन् त्यांत कांहीं वावगं नाहीं. पण मग मोलकरणीपाशीं जें कांहीं बोलली—”

“काय बोलली असं आई?” संशयानें व्याकुळ होऊन अरुण म्हणाला.

“कुठं बोलावं, काय बोलावं हें देखील तिला कळत नाहीं. गोरीगोमटी नि कपाळकरंटी.”

" अग पण बोलली तरी काय ती असं ?

" तुझ्यापेक्षां तो नाटकी तिला बरा दिसला म्हणे. त्याचे ते केंस नि कपडे यांचीं अगदीं मिटक्या मारून वर्णनं चाललीं होतीं मोलकरणीपाशीं."

अरुण स्तंभितच झाला. रजनीची अरसिकता व दागिन्याचा सोस या गोष्टी त्याला निदान क्षम्य तरी वाटत होत्या. गुलाबाला कांटे हे असायचेच ! पण इथें तर त्याचा वास देखील विषारी आहे असा अनुभव येऊं लागला. आपल्या अंगच्या गुणांची रजनीला किंमत वाटत नाहीं; नटलेला नाटकी मात्र तिला आवडतो ! आपल्या स्फूर्तिदेवतेची अभिरुचि इतकी हीन असावी ना ? रजनी देवळाकडून परत आली. अरुण शक्य तितका शांतपणानें म्हणाला, ' बालकवींची कविता काढ जरा ! '

" माहेरीं राहिली ती. ताईची वाचून झाली नव्हती म्हणून ठेवली. लवकरच पाठवून देईल ती. "

अरुण कांहींच बोलला नाहीं.

" पतकरली का ती दीडशेंची नोकरी ? "

" नाहीं. "

" आयती घरीं चालून आली होती—"

" पैशासाठीं गवळी कांहीं खाटीक होत नाहीं. "

" कशीं छान कांकणं झालीं असतीं दोन महिन्यांत ! "

" आणि मीहि त्या नाटकी माणसासारखा कसा छान दिसूं लागलों असतों ! "

* * * *

अरुणानें आपल्या भडकलेल्या मनाला लगाम घालण्याचा खूब प्रयत्न केला. पण त्या नाटकी माणसाशीं रजनीनें आपली तुलना करून आपल्याला हीन लेखावें हें कांहीं केल्या त्याला विसरतां येईना. त्याचें मन पुन्हां पुन्हां त्याच विषयाकडे वळे. चांगली सुंदर, सुविद्य, सुशील घराण्यांतली मुलगी पाहिली, पण सुंदर बोराच्या आंत तक्षक निघावा त्याप्रमाणें तिची हीन अभिरुचि अनुभवाला आली. चांगल्या घराण्यांतील या मुलीवर हे हीन संस्कार झाले केव्हां ? कांहीं केल्या हें कोडें त्याला उलगडेना.

मुंबईला चित्रांचें मोठें प्रदर्शन भरणार होतें. त्यासाठीं ' सूर्यास्त कीं सूर्योदय ? ' याशिवाय बाकी सर्व पुरीं झालेलीं चित्रें घेऊन अरुण निघाला. " आठवड्यानं येईन मी परत. "

" तें सूर्यास्ताचं चित्र नाहीं का न्यायचं ? " रजनीनें विचारलें.

" जें विकावयाचं नाहीं तें बाजारांत न्या कशाला ? "

तें कां विकायचें नाहीं, याविषयीं रजनीनें अवाक्षरहि विचारलें नाहीं. अरुण निराश झाला.

मुंबईहून अरुण पंधरा दिवसांनीं परत आला. त्याचीं दोनतीन चित्रें चांगल्या दरानें खपल्यामुळें डायमंड तासाचीं कांकणें त्यानें रजनीकरतां आणलीं होतीं. कांकणांची गोष्ट गुप्त ठेवावयाची व रात्रीं तीं एकदम रजनीच्या हातांत घालून तिला चकित करायची असा त्याचा बेत होता. कोटबिट काढून त्यानें-आपल्या खोलींत पाऊल टाकलें, तों आपलें आवडतें चित्र त्याला कुठेंच दिसेना. त्यानें रजनीला हांक मारली. " इथलं चित्र कुठं गेलं ? "

" विकून टाकलं मी ! "

" विकून ? " रजनीनें पोटच्या पोराचा गळा दाबण्याइतकें अधम कृत्य केलें असें दर्शविणाऱ्या तीव्र स्वरानें अरुणानें प्रश्न केला.

" इतकं कांहीं भडकून जायला नको ! पाण्यासारखा पैसा मिळाला हो त्याला ! "

" कुणाला विकलंस ? "

" ती नायकीण तसबीर काढून घ्यायला इकडे आली होती ती–त्याला तीनशें रुपये दिले हो तिनं. "

" ते तीनशे रुपये घेऊन त्या नाटक्याबरोबर पळून गेली नाहींस हेंच माझं भाग्य ! " अरुण तिरस्कारानें म्हणाला. कोट टोपी घालून आपल्या चित्राचें दर्शन घेण्याकरतां तो तत्काळ घराबाहेर पडला.

त्या चित्रांतील रजनीची मूर्ति पाहतांच त्याचा राग ओसरला. ती कशीहि असली तरी आपली आहे, तिच्यांत कांहीं दोष असले तरी ते आपणच सुधारून घेतले पाहिजेत. मूल कुरूप असलें तरी आई कांहीं त्याला टाकून देत नाहीं.

अरुण घरीं येऊन पाहतो तों रजनीला अंथरुणावर निजविली असून आई तिच्या अंगावरून हात फिरवीत बसली आहे. अरुणाला पहातांच आई म्हणाली, " पाहि-लंस बाबा, किती आकरताळी आहे ती. तूं कायसंसं बोललास म्हणून तावातावानं

जाऊन तळींत उडी टाकलीन् हिनं ! लगेच धांवाधांव होऊन कुणी वर काढली म्हणून बरं. नाहीं तर तोंड दाखवायला जागा नव्हती मला ! ''

अरुण रजनीच्या उशापाशीं बसून विचार करूं लागला. किती निष्पाप मुद्रा आहे हिची ! मग हा आततायीपणा हिनें आणला कुठून ? कवंडळाप्रमाणेंच स्त्रीचें रूपहि फसवेंच असतें काय ? पण इतक्या दिवसांच्या अनुभवांवरून रजनी स्वभावानें वाईट नाही हेंहि आपणाला दिसून आलें आहे. रंगेल नाटकी माणसें बरीं दिसणें, गुणापेक्षां पैशाची किंमत जास्ती मानणें, क्षुल्लक गोष्टीसाठीं संतापून जीव द्यायला जाणें या गोष्टीचें मूळ हिच्या स्वभावांत नाहीं तर आहे कशांत ? कांहीं का असेना, असली ब्याद माहेरीं पाठवून द्यावी व स्तब्ध बसावें.

त्याच त्याच विचारांचे घण चुकविण्याकरितां तो रजनीचीं पुस्तकें चाळूं लागला. अगदीं वरच बालकवींची कविता होती. पुस्तक ' पाठवून दिलंन् वाटतं हिच्या बहिणीनं ' असें म्हणून अरुण तें चाळूं लागला. मधल्याच पानांत एक उघडें पत्र होतें. रजनी माहेरी असतांना आपण तिला पाठविलेलें पत्र असेल असें वाटून तो तें वाचूं लागला. पत्र त्याच्या मेव्हणीचें असून तें तिच्या नवऱ्याकडून तिला आलें होतें. एक वेळ तें वाचूं नये असें अरुणला वाटलें. पण पहिल्या चारपांच ओळी वाचल्यानंतर पापपुण्याचे सर्व विचार विसरून तो वहातच गेला.

" मी आणखी एक दिवसदेखील तुला माहेरीं रहायची परवानगी देणार नाहीं. पदरीं पडलेलें पवित्रच असतें. पण तें अपवित्र होऊं नये एवढी काळजी घेणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. तुझी वडील बहीण आतां घरीं आलेली असल्यामुळें तिचा गुरुपदेश तुला पुन्हां मिळण्याचा संभव आहे. मागल्या खेपेला तुला चार महिने माहेरीं ठेवून मी माझ्यामागें हिऱ्यांच्या कुड्यांचें टुमणें लावून घेतलें. तुझ्या अक्काबाईचें ' अलंकार हाच स्त्रीचा पति ' असें मत असेल ! पण स्वतःची चांदी आटवून बायकोचे दागिने करण्याची माझी इच्छा नाहीं. सोन्यासारखा नवरा असतांना दागिन्याच्या पायीं त्याला कर्जबाजारी करून तुझ्या थोरल्या बहिणीनें आपला संसार धुळीला मिळविला तेवढें बस्स झालें.

तुझे दुसरे गुरु तुझे बंधुराज ! त्यांच्या लीला तर अवर्णनीय आहेत. घरचे पैसे खाऊन कॉलेजांत जाण्याच्या सबबीवर ते पुण्यांत मजा मारीत असत व नाटक-कंपन्यांतून फिरत. आतां कॉलेजहि त्यांनीं सोडलें आहे, ( या सत्कृत्याबद्दल युनि-व्हर्सिटीनें त्यांना एखादी पदवी देणें अवश्य आहे. ) त्यांचा तो नाटकी थाटमाट

तुझ्या डोळ्यांत भरला म्हणजे आपला वकील नवरा अगदीं गचाळ आहे असें तुला वाटूं लागेल. स्वतःच्या बायकोला गचाळ दिसण्याची इच्छा पितामहपद प्राप्त झालेल्या नवऱ्यालादेखील नसते. तेव्हां तुझ्या डोळ्यांवर बंधुराजांच्या नटवेपणाची नवी धुंदी चढण्याच्या आधींच तुला परत आणलेली बरी.

या दोन गुरूंची गुरु अशी तुझी आई आहेच. आमटींत मीठ कमी पडलें म्हणून सासरे बोलले, एवढ्या मोठ्या कारणासाठीं तिनें लगेच मागच्या दारीं जाऊन विहिरींत उडी टाकण्याची गोष्ट मी अलीकडेच ऐकली. तिच्या तालमींत तूं चारसहा महिने राहिलीस तर घरांत मला बोलण्याचीहि चोरी होईल. जरा रागानें बोललों कीं तूं जीव द्यायला निघूं लागशील. नवऱ्याला सळो का पळो करून सोडण्याची ही अजब युक्ति हस्तगत होण्याच्या आधींच तुझें तिथून उच्चाटन केलेलें बरें.

लहानपणीं या साऱ्या मंडळीचे संस्कार तुझ्यावर झाल्यामुळें स्वभावाचे हे अवगुण थोड्याफार प्रमाणांत तुझ्यामध्यें होतेच. पण दोन दोन वर्षे तुला माहेरीं न पाठविण्याचें धोरण ठेवून या अवगुणांची नांगी मी कशी तरी मोडली होती. दिलेल्या आठवड्यापलीकडे तुला अधिक रहावयाला परवानगी देणें म्हणजे मी माझ्या हातांनीं आपल्या पायांवर धोंडा पाडून घेण्यासारखें आहे. ”

हा मजकूर वाचतांच रजनीच्या स्वभावांतील वैगुण्याचीं कारणें अरुणापुढें स्पष्ट उभीं राहिलीं. ओल्या मातीला कुंभारानें वाईट आकार दिला तर त्यांत त्या मातीचा काय दोष ? अरेरे ! गरीब बिचारी रजनी ! जन्मापासून कळीला कीड लागावी त्याप्रमाणें अविचारी व आपस्वार्थी लोकांच्या सहवासांतच ती वाढली ! रजनीच्या अंगावरून हात फिरवीत असलेली आई म्हणाली. “ अरुण, हिला बाधाबिधा तर झाली नसेल ना ? उद्यां देवाला विचारून बघूं या. कांहीं नेम नाहीं बाबा. करकरीत तिनीसांजादेखील बाहेर जाते. भुतानं झपाटलं असेल एखाद्या ! ”

“ एकच कां, अनेक भुतं बसलीं आहेत हिच्या मानगुटीला ! ” अरुण रजनीच्या चेहऱ्याकडे प्रेमार्द्र दृष्टीनें पहात म्हणाला. त्याच्या डोळ्यांतून टपटप टिपें पडूं लागलीं.

“ त्यांना थारवूं या बाबा कसं तरी ! ”

“ अशी थोडक्यावर राजी व्हायला हीं साधीं सुधीं भुतं नाहींत, आई. माहेरचीं भुतं तीं ! जन्मभर पिच्छा सोडायचीं नाहींत. ”

१९२९

# स्वराज्यभिक्षा

"क्षत्रियानें भिक्षा घ्यायची नसते, घालायची असते. किल्लेदारींत काळ्याचे पांढरे झालेल्या आपणांसारख्या मुत्सद्दी मराठ्यांना मी हें सांगावें असें नाहीं."

"किल्लेदारींत आजपर्यंत काळ्याचे पांढरे झाले. पातशाहाशीं बेमान होण्याचा तुमचा सल्ला ऐकून त्यांना काळिमा आणण्यांत हंशील काय? खुशाल पातशहाकडे चला, त्याचे पाय धरा, मिनतवाऱ्या करा आणि किल्ला सुपूर्द करून देण्याचे फर्मान घेऊन या."

"किल्लेदार साहेब, भिकेची हंडी शिंक्याला चढणें अशक्य! मग सिंहासनावर कुठून चढणार?"

"मीहि तेंच म्हणतों. कुणीकडे दिल्ली-विजापूरचे पातशहा आणि कुणीकडे दख्खनच्या कोंपऱ्यांतला शिवाजी?"

"धनाजी, दिल्ली-विजापूरचे पातशहा काय अस्मानांतून उतरले नि मराठेच मात्र जमिनीवरल्या दगडाधोंड्यांतून उपटले? आज ते सिंहासनावर आहेत म्हणून थोर आणि आम्ही सिंहासनावर नाहीं म्हणून चोर!"

"या लष्करच्या भाकऱ्या भाजल्या नाहींत तर काय टांचा घांशीत उद्यां उपाशीं मराल? एरवीं मला बोलायचें कारण नव्हतें! पण तुम्ही माझ्या जांवयालाहि आपल्या नादाला लावलें आहे म्हणून बोलण्याची पाळी आली!"

"मग यांत तुमच्या जांवयांनीं वाईट काय केलें? आपल्या संताजी या नांवाला शोभण्यासारखाच पंथ धरला."

" माझें एक उत्तर ब्रह्मलिखिताप्रमाणें ठरलेलें आहे. जान सोडीन पण इमान सोडणार नाहीं हें माझें ब्रीद आहे ! पातशहा धनी व मी त्याचा बंदा चाकर आहें. किल्ला तुमच्या हवालीं करून मी निमकहराम होणार नाहीं. "

" पातशहा तुमचा धनी आणि घांसभर अन्नासाठीं तडफडणारे, जुलुमाच्या जात्यांत भरडले जाणारे, अन्यायाच्या आगींत होरपळून निघणारे लाखों मराठे मात्र तुमचे कोणीच नव्हत ! किल्लेदारसाहेब, कानामागून येऊन तिखट झालेल्या या पातशहाचें आपण देणें आहों असें तुम्हीं मानतां; आणि ज्या भूमीनें तुमच्या बेचाळीस पिढ्या आपल्या मांडीवर खेळविल्या, ज्या जातभाईनीं सुखसंकटांत त्यांची साथ केली, ज्या धर्मबांधवांनीं त्यांना आपलेपणानें जवळ ओढलें, त्यांचें मात्र तुम्हीं काडीइतकेंहि देणें लागत नाहीं ! खासा न्याय ! उद्यां काळाचें बोलावणें आल्यानंतर आपल्याला देवाघरीं पोंचवायला पातशहा येणार नाहीं. आपलेच मराठेभाई येतील ? "

किंचित् मृदुस्वरानें धनाजी म्हणाला, " पण आज आम्ही पातशहाचें मीठ खात आहोंत ? "

" असाल ! पण तें मीठ आपल्या जातभाईचें रक्त सुकवून काढलें आहे. "

" तुमचें स्वराज्य म्हणजे तरी काय, अळवावरलें पाणी ! पाणी जाईल उडून नि अळवाच्या खाजेनें घसा मात्र जन्मभर खवखवत राहील. "

" पण हिंदूंसाठीं, गो–ब्राह्मण–प्रतिपालनासाठीं आपण एवढादेखील मनाचा मोठेपणा दाखविणार नाहीं का ? "

" ह्या मुखवट्यांनीं माझ्यासारखा दर्दी फसायचा नाहीं. राज्य मिळण्याच्या आधीं सर्वच संत असतात ! पण मिळाल्यावर सुतळीचा तोडा देखील सुटत नाहीं कुणाच्या हातून ! "

" सुतळीचा तोडा काय, पण सोन्याचे तोडे–फार काय साऱ्या राज्याच्या सनदा देईन मी. कुणीकडून हिंदु तितका सुखी झाला म्हणजे झालें. "

" तुम्हांला स्वार्थासाठीं स्वराज्य स्थापावयाचें आहे. असल्या स्वार्थाचा साथीदार होऊन मी निमकहराम होऊं चाहत नाहीं. "

" स्वराज्य मंदिराच्या वाटेंत जो जो कांटा येईल–मग तो पाठचा भाऊ असो नाहीं तर पोटचा मुलगा असो–तो मी हरप्रयत्नांनीं उपटून टाकणारच ! एरवीं मी कुणाशीं इतकी हुजत घालत बसलों नसतों. पण तुमचे जांवई संताजीराव माझा

उजवा हात आहेत. त्यांची भीड मला मोडवेना. गडाखालीं जाऊन त्यांनांच पाठवून देतों मी. म्हणजे हा सूर्य नि हा जयद्रथ होऊन आज सूर्यास्तापूर्वी या प्रकरणाचा काय तो सोक्षमोक्ष लागेल. ''

* * * *

किल्लेदारांनीं सदरेवरून आंत जाऊन ' मंजुळे ' म्हणून मुलीला हांक मारली व तिला जांवईबुवा येणार असल्याची खबर दिली. लग्न झालें त्यावेळीं संताजी धनाजी-सारखाच पातशहाच्या पदरीं नोकर होता. धनाजीनीं मंजुळा त्याच्या पदरांत टाकली व हातपाय थकले कीं किल्लेदारीहि तेथेंच टाकण्याचा त्यांचा बेत मुक्रर झाला होता. पण लग्नाच्या वेळीं शुक्रासारखा असलेला जांवई हल्लीं त्यांना शनीसारखा वाटूं लागला होता. शिवाजीमहाराज दिल्ली आग्र्याला गेल्यामुळें, लाट ओसरून जाईपर्यंत डोकें खालीं करणेंच जसें श्रेयस्कर असतें, त्याप्रमाणें संताजीच्या बापानेंहि पातशहाची चाकरी पत्करली होती. पण पटाईत पोहणारा लाट ओसरतांच जसें डोकें वर काढतो, त्याप्रमाणें महाराष्ट्रांतील स्वराज्याच्या व शिवरायाच्या भक्तांनीं महाराज दिल्लींतून येतांच त्यांच्याकडे धांव घेतली. संताजी सहासात महिन्यांपूर्वीच महाराजांना सामील झाला होता. स्वराज्याचा गेलेला मुलूख परत मिळविण्याच्या कामांत त्याला सासुर-वाडीकडे फिरकायला देखील फुरसत मिळाली नव्हती. ' स्वार्थावांचून कुणी कांहीं करीत नाहीं, ' ही धनाजीची पक्की समजूत ! म्हणूनच शिवाजीमहाराजांचा स्वराज्य-स्थापनेचा प्रयत्न म्हणजे मगरापासून वांचविण्याच्या मिषानें मोठ्या माशानें धाकट्या माशाला गिळण्याचा योजलेला कावा होय असें तो मानी. पातशहाविरुद्ध उठून स्वराज्य स्थापणें म्हणजे हातचें सोडून पळत्याच्या पाठीला लागायचे. बरें, तें पळतें सावज मिळालें तरी मिष्ठान्न मेजवानी होणार शिवाजीची ! ' या तरुण मंडळींना मागचा पुढचा पोंच नसतो. एखाद्यानें हुल्लड उठविली कीं लागले मेंढरासारखे त्याच्यामागून धांवायला ! पुढें हिरवळीखालीं झांकलेला खड्डा आहे हें पहातो कोण ?' हीं त्याचीं अत्यंत आवडतीं वाक्यें. एकदां एक कीर्तनकार गडावर आले होते. त्यांनीं ' आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति ' या सूत्रावर सुंदर निरूपण केलें. तेव्हांपासून धनाजी पुनःपुन्हां मंजुळेला म्हणे, ' तुझ्या नवऱ्याला या पोट-भरू हरिदासाइतकें देखील व्यवहारज्ञान नाहीं. शिवाजीला स्वतःसाठीं राज्य स्थापायचें आहे. ह्या वेड्यापीरांना वाटतें कीं, त्याला मुसलमानांच्या जुलुमांतून देवाब्राह्मणांची सुटका करायची आहे. मांजरीचें मऊ अंग यांना दिसतें आहे. पण

नखें निघतील तेव्हां यांचे डोळे उघडतील ! उद्यां छत्रपती झाला म्हणजे यांना फुकाच्या शब्दानें विचारणार देखील नाहीं. '

* * * *

मंजुळा हातानें मोगरीच्या कळ्यांची माळ करीत व तोंडानें एक गीत गुणगुणत बसली होती. गेल्या सात महिन्यांत तिला संताजीचें दर्शन स्वप्नांत काय घडलें असेल तेवढेंच. आपल्या नवऱ्यानें शिवाजीच्या भजनीं लागावें व आपली वास्तपूसहि करूं नये याचें तिला अलीकडे फार वैषम्य वाटूं लागलें होतें. मराठ्यांनीं आज हा किल्ला घेतला, ती लढाई जिंकली, अशा बातम्या वरचेवर तिच्या कानीं पडत. अशी बातमी आली कीं, तिच्या काळजांत चर्र होई. लढाई म्हटली म्हणजे त्यांत कांहींना कांहीं माणसें कामाला यायचींच ! त्या पडलेल्या माणसांत आपले घरधनी तर नसतीलना अशी एक दुष्ट कल्पना तिची इच्छा नसतांहि अग्नीच्या ज्वाळेप्रमाणें तिच्या मनाला चाटून जाई. धनाजीनें एखाद्या फुलाप्रमाणें आजपर्यंत तिला वागविली होती. पण गेले सात महिने पतिविरहाच्या तापानें हें फूल किंचित् कोमेजून गेलें होतें. पतीचें आगमन आज होणार हें ऐकल्यापासून तें पुन्हां टवटवीत झालें होतें. मुग्धमधुर गीत गुंजारव आज त्याच्यांतून बाहेर पडत होता.

**" कधिं सांग सखे सांग मुद्रिके सांग '**
**होईल मज दर्शन सांग "**

गीत म्हणतां म्हणतांच त्याचा अर्थ तिच्या डोळ्यापुढें उभा राहिला. त्या करुण अर्थापाठोपाठ तो धुऊन टाकण्याकरितांच कीं काय, आंसवेंहि तिच्या डोळ्यांत आलीं. " मुद्रिके, प्रभु रामचंद्रांची मूर्ति मला कधीं दिसेल ग ? " म्हणून व्याकुळून जाऊन काकुळतीनें विचारणाऱ्या सीतादेवीला पहिल्याच परतभेटींत प्रभूंनीं अग्निदिव्य करायला सांगितलें. आपल्या घरधन्यांच्या या भेटींत असेंच कांहीं वेडेंवांकडें निघणार नाहीं ना ? असा विचित्र विचार तिच्या मनांत व संताजी तिच्याजवळ एकदमच आला.

" लग्नांत माळ घालून हौस फिटली नाहीं वाटतें पुरती ? " त्यानें हंसत हंसत विचारलें.

चटकन् उभें राहून, त्याच्याकडे अपांग दृष्टीनें पहात मंजुळा उत्तरली, " त्या माळेच्या हातून पुरुषांना घरच्या घरीं बांधून ठेवण्याचें काम होत नाहींसें दिसतें ! म्हणून तिच्या जोडीला ही दुसरी देणार आहें. "

" पुरुषांनीं रणसिंह व्हावें असें बायकांनीं इच्छावें ! घरकोंबडेपणाचे अशुभ डोहाळे कशाला हवेत ? "

" अशी साखर पेरून सात महिन्यांचें विष गोड करायचें असेल मनांतून ! "

" शिवाजीमहाराजांच्या कृपाप्रसादानें सगळीच विषें गोड होतात. "

" मग त्यांच्याशींच लग्न लावलें असतें तर ! "

" लावलेंच आहेना ! आज सात महिने सावलीसारखा त्यांच्याबरोबर फिरतों आहें तें उगीचच का ? "

" मग आज ही सावली इकडचीशी वाट चुकली ? "

" या सात महिन्यांत कांहीं तरी चुकल्याचुकल्यासारखें वाटूं लागलें म्हणून आलों. पण दुसरें कांहीं चुकलें नसून माझी वाटच चुकली असें दिसतें. "

" आपल्यासाठीं जीव पाखडीत बसणाऱ्या माणसाची मेली आठवणहि नाहींना झाली इतक्या महिन्यांत ? "

" झाली कीं नाहीं झाली तें मनाला माहीत ! पण मन जाईल तिथें पायांना थोडेंच जातां येतें ? "

" न येईना. आतां मात्र हे पाय मी असे जखडून ठेवीन कीं, त्यांना येथून हालतांच येऊं नये ! कां बरें उगीच जीवाचें रान करून घ्यायचें ? "

" देशाच्या रानाची बाग व्हावी म्हणून. "

" मी बायको मनुष्य म्हणून मला या लढायाबिढाया समजत नाहींत; पण बाबांना देखील आपलें करणें बावगेंच वाटतें ! "

" म्हातारीं माणसें नि बायका यांच्यांत बांगड्यापेक्षां अधिक कांहीं अंतर नाहीं ! "

संताजीच्या या उद्धट उत्तरानें मंजुळा एकदम लाल झाली. नवऱ्यावर तिचें प्रेम होतें खरें ! पण बापाचाहि तिला अतोनात अभिमान होता.

" पण शिवाजीनें राज्य मिळविलें म्हणून आपणांला थोडाच एखादा तुकडा मिळणार आहे त्यांतला ! ना स्वार्थ ना तीर्थ. त्यापेक्षां पातशहाची किल्लेदारी संभाळूनच राहिलेलें बरें नाहीं का ? "

" महाराजांचें राज्य तमाम मराठ्यांकरितां, दरोबस्त दीनदुबळ्यांकरितां आहे. महाराजांना त्यांतल्या काडीचादेखील अभिलाष नाहीं. भरतानें वनवासी रामासाठीं

जसें राज्य संभाळलें, तसेंच ते आजच्या भोळ्याभाबड्या हिंदूंसाठीं संभाळीत आहेत ! ”

“ या झाल्या सांगायच्या गोष्टी नि दाखवायचे दांत ! हा बोकेसंन्याशीपणा उद्यां पोटाला तडस लागली म्हणजे आपसुक बाहेर पडेल ! ”

संताजीचा संताप आतां अनावर झाला, तो रागानें म्हणाला, “ खाण तशी माती ! आळशावर गंगा आली तरी तो आंथरुणांतच लोळत रहायचा ! तूं नि तुझे बाबा काय वाटेल तें करा. बायको कितीही आवडती झाली म्हणून तिच्यापायीं कांहीं कर्तव्याचा बळी द्यायचा नाहीं ! देवासाठीं फुलें असतात; फुलांसाठीं देव नसतात.”

संताजी आवेशानें तेथून झटकला, हें मंजुळेला प्रथम कळलेंच नाहीं. थोड्या वेळानें ती डोळे उघडून पाहते तों हातांतल्या अपुऱ्या माळेशिवाय तिथें दुसरें कुणीच नाहीं. तिनें भरून आलेल्या डोळ्यांनीं त्या माळेकडे पाहिलें ! तिला त्या सर्व अर्धोन्मीलित कळ्या कोमेजून गेलेल्या दिसल्या.

* * * *

आपल्या पायांपलीकडे पहायचेंच नाहीं अशा स्वभावाच्या माणसांपैकीं धनाजी होता. जांवयाचा दिवाळसण राहिला होता. गडाच्या किल्ल्या संताजीच्या पदरांत टाकून धनाजी तो साजरा करील अशी भोळी आशा संताजीच्या सोबत्यांच्या मनांत अंधुक रीतीनें वावरत होती. पण धनाजीनें संताजीवर आग पाखडून दिवाळीऐवजीं होळीचा सणच साजरा केला.

संताजीचा एक शब्दहि म्हाताऱ्यानें खालीं पडूं दिला नाहीं. त्याच्या साध्या सवा-लाला याचा जबरीचा जबाब हजर ! म्हाताऱ्यानें जांवयाला एका कोल्ह्याची गोष्ट सांगून उलट त्याचेंच मन वळविण्याचा प्रयत्न केला. त्या कोल्ह्यानें सिंह, वाघ, हत्ती वगैरेंच्या मदतीनें रानांतलें राज्य निर्मक्षिक केलें व मग कपटानें त्या बलाढ्य प्राण्यांचा एकमेकांकडून नाश करवला ! शिवाजी हा असलाच कावेबाज कोल्हा आहे; लोकांना अन्न मिळावें म्हणून स्वराज्य स्थापण्याचा बहाणा तो करीत असला तरी त्याला स्वतःचीच राज्याची भूक भागवावयाची आहे; कुणी झालें तरी ताक घुसळतो तें लोण्याकरितां; मग तुम्ही तरुण लोक उगीच घुसळखांबे कां होतां ? लोण्याचा चट्टामट्टा शिवाजी करणार व तुमच्या वांट्याला दोरीचे करकोचे येणार, वगैरे उपदेश धनाजीनें केला.

"माकडाला मौल्यवान् मण्याची किंमत कुठून कळणार?" असें बोलून चडफडतच संताजी गडाखालीं आपल्या छावणींत निघून गेला. मंजुळेला आपल्या कुंकवाचा करंडा तुफान दर्यावर हेलकावे खात वहात जात आहे असें वाटूं लागलें.

राजापूरच्या गंगेप्रमाणें गडाच्या गुप्त वाटा हां हां म्हणतां शिवाजीमहाराजांच्या छावणींत प्रादुर्भूत झाल्या. किल्ल्यावर छापा घालण्याचा वेत मुकर झाला. सासरा व जांवई यांचें वाग्युद्ध झालें तेवढें पुरे! प्रत्यक्ष हातघाई होणें बरें नाहीं असें वाटून महाराजांनीं संताजीला त्या दिवशींच्या चकमकींत तलवार चालविण्याची परवानगी दिली नाहीं. यवनांशीं करावयाचीं युद्धें स्वजनांशीं करावीं लागतात याबद्दल महाराजांना फार वाईट वाटे! पण करतात काय? पारतंत्र्याचा विंचू स्वजनांच्या पिंडीच्या आश्रयानें बसून विखारी नांग्या मारीत असतांना त्याला ठेंचून टाकतांना पिंडीवरहि थोडे फार घाव बसणारच! ठरल्याप्रमाणें महाराजांनीं किल्ल्यावर छापा घातला. धनाजीनें तरुणाला शोभण्यासारखी तलवार गाजविली. पण महाराजांनीं शौर्याची शर्थ केल्यामुळें त्याचें कांहीं चाललें नाहीं. चकमकींत तो मारला गेला व किल्यावर मराठ्यांचें निशाण फडकूं लागलें.

* * * *

दहा दिवस मंजुळेच्या डोळ्यांचें पाणी खळलें नव्हतें. पितृछत्र नाहींसें झाल्यामुळें हे दिवस तिला दुर्दिन वाटावेत हें स्वाभाविकच होतें. वर्षाकालीन मेघाप्रमाणें तिचा चेहरा काळवंडून गेला होता; जोरानें वाहणाऱ्या वाऱ्याप्रमाणें मधून मधून ती दीर्घ निःश्वास टाकीत होती, आणि पाऊस पडत असतांनाच चमकणाऱ्या विजेप्रमाणें डोळ्यांतल्या अश्रूंबरोबरच सूडाच्या विचाराची चमकहि तिच्या डोळ्यांत चमकून जात होती. 'बाबांच्या मृत्यूचा सूड घेईन तरच नांवाची मंजुळा! मुलीला क्रिया-कर्मांतर करतां येत नाहीं म्हणे! न येईना! त्यांना दुस्मानाच्या रक्तानें तिलांजलि देईन तेव्हांच माझा आत्मा शांत होईल!' असले विचार या दुःखाच्या भरांतहि तिच्या मनांत घोळत होते. स्वराज्य स्थापणें म्हणजे दुसऱ्यांच्या बापाभावांचा खून करणें! आग लागो त्या स्वराज्याला! या स्वराज्याच्यापायीं किती पोरें पितृछत्र नाहींसें झाल्यामुळें पोरकीं झालीं असतील! पारतंत्र्याचे पाश तोडण्याच्या मिषानें या क्रूर लांडग्यांनीं किती गरीब गाईचीं मंगळसूत्रें तोडलीं असतील! उद्यां सुखाचें सोनें मिळणार ही भोळी आशा दाखवून आज कितीकांच्या जन्माची माती केली असेल! बाई, बाई, बाई! हा शिवाजी नाहीं, राक्षसच जन्माला आला आहे!

आपल्या बाबांचा सूड उगवला तर सर्व लोक याच्या कैचींतून सुटून आपल्याला धन्यवाद देतील ! घरीं झुरत बसणाऱ्या बायकांना नवरे व जीव पाखडणाऱ्या आयांना मुलगे परत मिळतील ! वणवण करीत फिरणाऱ्या लोकांच्या तोंडांत सुखाचा चतकोर पडेल ! तें कांहीं नाहीं. या शिवाजीला जगांतून नाहींसा केला कीं पृथ्वीचा अर्धा भार हलका होईल ! '

अशा विचारांच्या वादळांतून क्षुब्ध झालेल्या हृदयानें आणि तारवटलेल्या डोळ्यांनीं मंजुळेनें दहा रात्री काढल्या होत्या. इतक्या रात्रींत तिचा डोळ्याला डोळादेखील लागला नव्हता. मधून झांपड पडलीच तर धनाजीची मूर्ति–मानेवर व छातीवर जखमाच जखमा असलेली रक्तबंबाळ मूर्ति–तिच्या डोळ्यापुढें उभी राही व अंगाला दरदरून घाम सुटून ती थरकांप कांपत जागी होई ! बाबांच्या मृत्यूचा सूड घेईपर्यंत आपणाला ते असेच दिसत राहणार असें तिला पक्कें वाटूं लागलें. किल्ल्यांत कुठेंहि नजर टाकली तरी प्रत्येक स्थळ तिला तिच्या प्रिय पित्याचीच आठवण करून देई. इथें लहानपणीं आपण धांवतांना पडलों. दगडावर आपटून आपणांला खोक पडली. रागानें आपण दगडाला मारण्यासाठीं त्याच्यावर पाय आपटूं लागलों. पण बाबांनीं पाय झणझणतील म्हणून आपल्याला कडेवर घेऊन तलवारीनें त्या दगडाला शिक्षा केली. तिथें लगीन झाल्यानंतर बाबा म्हणाले होते ' का मंजुळाताई, आतां आमची होईल का आठवण ? ' ह्या व अशा गोष्टी तिच्या स्मृतिसागरांतून बाहेर पडत. त्यांत पितृप्रेमाचें अमृत होतें, तसेंच पित्याचा वध करणाऱ्याचा सूड घेण्याच्या इच्छेचें हालाहलहि होतें.

दिवस कुणासाठीं कधींच रहात नाहींत. धनाजीच्या मृत्यूला महिना लोटला. मंजुळेचा द्वेषाग्नि या महिन्यांत विझला तर नाहींच ! उलट हृदयांतल्या हृदयांत धुमसत राहिल्यामुळें त्याच्या धुरानें तिची अंतर्दृष्टि असून नसल्यासारखी झाली होती. बायकांना अबला म्हटलें तरी सारें रामायण नि महाभारत त्यांनींच केलें आहे. कैकेयीनें दोन वर मागण्याची चतुराई दाखविली नसती तर रामायणाचा शेवट बालकांडाबरोबरच झाला असता ! द्रौपदीनें दुःशासनाच्या रक्तानें भिजलेल्या हातानें वेणी घालून घेण्याचा हट्ट धरला नसता तर पांडवांना जन्मभर वनवासांतच रहावें लागलें असतें ! कैकयी–द्रौपदींना जर एवढें करतां आलें, शब्दाच्या शक्तीनें त्यांनीं पतीकडून आपल्या प्रतिज्ञा जर पूर्ण करून घेतल्या, तर तें आपणांलाच कां साधूं नये असें मंजुळेला वाटे. तिचें मन तशी कारवाई करूंहि लागलें.

ती नेहमीं अशी विचारमग्न असते असें पाहून संताजी म्हणाला, " असा विचार करून डोकें पिकून नाहीं का जाणार ? केंसाच्या अंबाड्या झालेली बायको नवऱ्याला आवडत नाहीं हं ! "

" मीसुद्धां तेंच म्हणतें ! व्हायचें तें होऊन गेलें. सटवीनें कपाळीं लिहिलेलें समुद्राला देखील पुसून टाकतां यायचें नाहीं. मनाला विरंगुळा वाटावा म्हणून एक मागणी करीत आहें. पुरविणें होईलना ? "

" सांग बुवा काय पाहिजे तें, मी पडलों शिपाईगडी ! तलवारीनें आम्हांला हृदयें उघडतां येतात, पण तर्कानें नाहीं. "

" मागणें कांहीं अधिक नाहीं. परवां रथसप्तमी आहे. तेव्हां खऱ्याखुऱ्या सूर्याला—आपल्या शिवाजी महाराजांना नैवेद्य दाखवूनच यंदां सण साजरा करावा असें माझ्या मनांत आलें आहे. "

संताजी आश्चर्यचकित झाला. शिवाजीला आपलपोटा, स्वार्थी म्हणणाऱ्या धनाजीची मुलगीच ही मागणी करीत आहे, या गोष्टीवर त्याचा प्रथम विश्वा-सच बसेना.

" पण राणीसाहेबांचें महाराजांविषयीं चांगलें मत नव्हतें ना ? "

पूर्वीं नव्हतें ! पण आतां झालं आहेना ? राजा तशी प्रजा नि धनी तशी राणी. मग रथसप्तमीच्या दिवशीं ताटाला बोलावणार ना महाराजांना ? "

" नाहीं म्हणून कसं चालणार ? नकार दिला तर या डोळ्यांतल्या अमृताचें क्षणांत विष होईल ! " असें म्हणून संताजीनें प्रेमभरानें तिच्या डोळ्याकडे पाहिलें. कां कोण जाणे तो एकदम चरकला. ते डोळे सीतेचे नसून कैकयीचे आहेत असें त्याला वाटलें ! त्याची मंजुळा त्याला हरिणाक्षी वाटे. पण आज तिच्या दृष्टींत हरिण व वाघ यांच्या दृष्टीचें विलक्षण मिश्रण दिसत होतें.

* * * *

रथसप्तमीची गडावर कोण गडबड ! संताजीचा स्नेही व मंजुळेचा वडील दीर या नात्यानें आज महाराज गडावर येणार होते. सारी रात्र मंजुळेला झोंप नव्हती. ती या कुशीवरून त्या कुशीवर होई. पाहुणा घरीं यायचा असला म्हणजे बायकांना तो येऊन जाईपर्यंत सुचत नाहीं काहीं. लढाईच्या आदल्या रात्रीं सेनापतीच्या जिवाची देखील इतकी तळमळ होत नसेल.

" नीज स्वस्थ तूं. जेवणाच्या बेतांत थोडें उणें असलें म्हणून महाराज कांहीं रागावणार नाहींत. " संताजीच्या या समजुतीनें मंजुळेची उडून गेलेली झोंप कांहीं परत आली नाहीं. पहिला कोंबडा आरवतांच ती उठली. गडाखालीं जाऊन महाराजांचें स्वागत करावयाचें असल्यामुळें संताजीहि उठला.

" महाराजांच्या मोठेपणाला शोभण्यासारखें साहित्य आपल्याकडे नाहीं ! पण त्यांच्या खिरीला सोन्याची वाटी नि बाकीच्यांना चांदीच्या वाट्या ठेवल्या म्हणजे बरें दिसेल नाहीं ! " मंजुळेनें उठतां उठतां विचारलें.

" त्या बाबतींत बायकांचीच बुद्धि अधिक चालते. " संताजीनें हंसत हंसत उत्तर दिलें.

गडाला सूर्यनारायणाचें व महाराजांचें दर्शन बरोबरच झालें. महाराजांच्या मागें कामाचा लकडा असल्यामुळें, जेवणाचा बेत सकाळचाच ठेवला होता. सर्व मंडळी पाटावर येऊन बसली. बसतां बसतां महाराज म्हणाले, " काय संताजी, तुमच्या मंजुळाबाईना आमची ही धामधूम आवडत नाहीं म्हणून तुम्हीं पूर्वी सांगत होतां ! पण आजचा हा थाट तर निराळेंच बोलतो आहे ! मंजुळाबाई, आजचा हा मेजवानीचा थाट कुणाकरितां आहे ? "

दाराआड उभी असलेली मंजुळा म्हणाली, " कुणाकरितां म्हणजे ? सरकारस्वारीकरितां. "

" झालें तर मग. तुम्हांला वाटतें शिवाजी राज्य मिळवितो तें स्वतःकरितां ! पण बायका जसा मेजवानीचा थाट स्वतःकरितां न करितां पाहुण्याकरितां करतात तसेंच माझेंहि आहे. माझ्याहि राज्याचा थाट पाहुण्यासाठींच आहे. हे पाहुणे म्हणजे निढळाच्या घामानें शेतांतून पीक काढणारे शेतकरी, वैराग्यपूर्वक धर्मरक्षण करणारे ब्राह्मण, मुलाबाळांचीं मनगटें भरदार करणाऱ्या गोमाता व मंजुळाबाई, पतीला पुरुषार्थाला प्रवृत्त करणाऱ्या तुमच्यासारख्या पतिव्रता होत. "

मंजुळेचें मन या भाषणानें हलून गेलें. इतक्यांत संताजी म्हणाला, " उशीर होतो आहे बोलण्याच्या नादांत. प्रसाद वाढ म्हणजे मंडळी बसतील. "

मंजुळा एका ताटांतून खिरीच्या वाट्या घेऊन आली. सोन्याची वाटी तिनें महाराजांच्या ताटापुढें ठेविली. ती ठेवतांना तिनें आपले ओंठ घट्ट दाबून धरले होते. तिचे हात थरथर कांपत होते. संताजीनें तिच्याकडे पाहिलें. तें कांपणें लज्जेचें

नव्हतें; तें ओंठ दाबणें विनयाचें नव्हतें ! मनांतल्या पापाचा परिस्फोट होऊं नये म्हणून तें तोंडाला ठोकलेलें कुलूप होतें ! महाराजांना ताटाला बोलवायचें ठरलें त्या वेळची मंजुळेची मुद्रा संताजीच्या मनश्चक्षूंपुढें उभी राहिली. गंगेप्रमाणें निर्मल असणारे मंजुळेचे डोळे एकदम कालिया डोहासारखे कां होतात ? क्षणार्धात एक भयंकर संशय त्याच्या मनांत आला. त्याचें बीज रुजलें नाहीं तों त्याला फळेंहि लागलीं. मंजुळा इतर वाट्या ठेवून आंत जाणार तोंच संताजी म्हणाला, " महाराज, आपली सोन्याची वाटी मला द्या. "

महाराजांना आश्चर्य वाटलें. मंजुळेच्या डोळ्यापुढें काजवे चमकूं लागले. संताजीचें मागणें विलक्षण वाटून महाराज म्हणाले, " सोन्याच्या वाटीवरसें मन गेलें एकदम ? "

" त्यांत अमृत आहे म्हणून. चिरंजीव व्हावें असें कुणाला वाटत नाहीं ? " महाराजांना पुढें बोलूं न देतां संताजीनें सोन्याची वाटी आपल्या ताटापुढें घेतली व आपली चांदीची वाटी तिथें ठेवली. संताजी महाराजांचा असा अपमान करील अशी कुणाचीच कल्पना नव्हती. महाराज देखील बुचकळ्यांत पडले.

सोन्याची वाटी घेऊन तो म्हणाला, " बसावें महाराजांनीं आतां—या सूर्य-नारायणाच्या प्रसादानें सुरवात करूं या. " सर्वांनीं आपापल्या वाट्या उचलल्या. संताजी ती सोन्याची वाटी तोंडाला लावणार तोंच मंजुळा धांवत आली—तिनें त्याच्या तोंडावर हात धरला—काळवंडून गेलेल्या चेहऱ्यानें ती चांचरत म्हणाली, " तोंड लावूं नका—माझ्या गळ्याची शपथ आहे, त्या खिरीला तोंड लावूं नका ! "

" महाराजांपुढें ठेवलेली खीर ही ! देवाचा प्रसाद नि तो घेऊं नका म्हणजे काय ? मी हा अवश्य घेणार ! "

" नका हो. " गयावया करून मंजुळा म्हणाली. " त्यांत आहे. "

" काय आहे ? "

" व—व—वि—" असें म्हणत मंजुळेनें जोरानें हिसडा देऊन ती वाटी उलथून टाकली व एकदम झीट येऊन ती धाडकन् संताजीच्या ताटांतच पडली.

* * * *

महाराजांना विष घालण्याचा मंजुळेनें प्रयत्न केला त्या गोष्टीनें प्रत्यक्ष विषानें झाली नसती इतकी संताजीच्या अंगाची आग झाली. केवळ दैवानेंच खैर केली

म्हणून आज महाराष्ट्राचे पंचप्राण वांचले असें त्याला वाटूं लागलें. या घोर अप-राधाबद्दल मंजुळेला कड्यावरून लोटून दिलें अगर हत्तीच्या पायीं दिलें तरी ती शिक्षा कमीच होईल, हें म्हणण्या इतका तो न्यायनिष्ठुर होता. त्यानें तत्काळ महा-राजांना तसें सुचविलेंहि. 'बायको मनुष्य म्हणून ठार मारावयाची नसेल तर अंधारकोठडींत जन्मभर डांबून ठेवावी. अवदसेला हीच शिक्षा योग्य होईल!' संताजी जळजळणाऱ्या हृदयानें म्हणाला. पण महाराज स्तब्धच होते. ते मंजुळेच्या मनाच्या मुळाशीं जाण्याचा प्रयत्न करीत होते. या मंजुळेला वाटेल तसें शासन करतां येईल! पण महाराष्ट्रांत घरोघर ज्या मंजुळा पसरल्या आहेत त्यांचीं मनें जर आपल्याविषयीं अशींच कुलुषित झालीं असतील तर? मंजुळेनें सोन्याच्या वाटींत विष घातलें याच्या बुडाशीं कट नाहीं, फितुरी नाहीं, शत्रूचे मुत्सद्दी नाहींत. मग विष घालण्यापर्यंत पाळी यावी असें आपण तिचें काय घोडें मारलें आहे?

तिच्या द्वेषाग्नीच्या ज्वाला इतक्या भडकायला कारण एकच! तिच्या पित्याचा वध. पण सर्व तऱ्हेनें आळवून-आर्जवून अगदीं नाइलाज झाल्यावरच आपण दंडाचा उपाय अमलांत आणला. शिवाय तो दंड तरी व्यक्तीच्या वैभवासाठीं अगर एका प्राण्याच्या लोभक्षोभासाठीं थोडाच केला होता? राष्ट्राच्या कल्याणाला विरोध केल्या-मुळेंच धनाजीला आपलें शीर गमवावें लागलें.

पण मंजुळेची समजूत कोण व कशी घालणार? संताजी आपला एकनिष्ठ भक्त तर त्याची पत्नी कट्टी वैरीण! त्याच्या संसारांत माती कालवायला अप्रत्यक्ष रीतीनें आपणच कारणीभूत होत नाहीं ना असाहि विचार महाराजांच्या दयार्द्र अंतःकरणांत डोकावून गेला.

मंजुळेला माझें करणें योग्य कां बरें वाटूं नये? नवी पालवी फुटूं लागली कीं, जुन्या पानांना गळून पडावें लागतें हें काय बागेंत तिनें पाहिलें नसेल? ओल्या लांकडांनीं स्वयंपाक होत नाहीं, हें काय बायकांना दुसऱ्या कुणी सांगितलें पाहिजे?

तिला हें सर्व कळत असेल! पण मी हा सारा पसारा स्वार्थासाठीं मांडला आहे अशी बापाप्रमाणेंच तिची समजूत असावी! याला उपाय काय? संताजीनें तर आपण असल्या कुळबुडव्या अवदसेचें मुखावलोकनदेखील करणार नाहीं असें सांगि-तलें. शेवटीं मंजुळेची चित्तवृत्ति निवळली तर ती समर्थांच्या मठांतच निवळेल असें वाटून महाराजांनीं सर्व हकीगतीसह समर्थांकडे तिची रवानगी केली.

* * * *

समर्थांच्या मठांत मंजुळेचें क्षुब्ध हृदय हळुहळू प्रसन्न झालें. सृष्टि व भक्ति यांचे दोर बांधलेल्या सुखाच्या झोंपाळ्यावर तिचें मन झोंके खाऊं लागलें. पक्ष्यांचें मधुर गाणें व भक्तांचें मधुर भजन, कृष्णेचें अमृततुल्य जल व समर्थांचा सुंदर उपदेश, अष्टौप्रहर तिला अनुभवायला मिळूं लागला. मनाचे श्लोक व करुणाष्टकें तिनें इतक्या त्वरेनें पाठ केलीं कीं, खुद्द समर्थांनादेखील तिच्या पाठांतराचें कौतुक वाटलें. असल्या बुद्धिमान् मुलीनें स्वराज्याच्या युद्धांत आपल्या पतीला साहाय्य करायचें सोडून सेनापतीच्या जिवावर कां उठावें, हें स्वामीनाहि प्रथम नीटसें कळेना. बोलतां बोलतां राजांनीं स्वार्थासाठीं आपल्या पित्याचा घात केला अशी तिची ठाम समजूत आहे हें समर्थांनीं ताडलें. एके दिवशीं मंजुळा नित्यनियमाप्रमाणें मनाचे श्लोक म्हणत असतां—

**समर्थाचिया सेवका वक्र पाहे ।**
**असा सर्व भूमंडळीं कोण आहे ? ।**
**जयाची लिला वर्णिती लोक तीन्ही ।**
**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥**

ह्या श्लोक म्हणायला व स्वामी तिच्याजवळ यायला एकच गांठ पडली. “ खरेंच मुली, समर्थाचिया सेवकाकडे वांकडी नजर करून पाहण्याची कळिकाळाची देखील छाती नाहीं. आमच्या शिवरायाचेंच पाहीनास. हजारों संकटांतून केंसालाहि धक्का न लागतां तो पार पडला आहे ! प्रभु रामचंद्राची कृपा ! ”

“ महाराज, लहान तोंडीं मोठा घांस घेतें याची क्षमा करावी. पण मला तर असें वाटतें कीं, शिवाजीराजांनीं आपणांवर देखील मोहिनी घातली आहे. स्वार्थाला मुलामा दिला म्हणून तो परमार्थ होईल काय ? ”

“ मंजुळे, तुझ्या डोक्यांत हें कुणीतरी वेड भरविलें आहे. तुकारामबुवांजवळ व माझ्याजवळ परमार्थाकडे वळण्याची उत्कट इच्छा राजांनीं कितीतरी वेळां प्रगट केली. पण असला मोहरा मोक्षाच्या मार्गावर नेणें म्हणजे राष्ट्राची राखरांगोळी करणें होय असें वाटून आम्हींच राजांना प्रपंचांत ठेविलें आहे ! ”

“ तसलें स्मशानवैराग्य काय जन्मभर टिकतें ? आतां राजे एक तनसडी सोडणार नाहींत; मग संसार सोडण्याच्या गोष्टी लांबच राहिल्या ! ”

" तनसडीच काय-चल माझ्याबरोबर ! माझ्या शिवबाच्या वीरवैराग्याची प्रचीति तुला दाखवतों. "

*　　　　*　　　　*　　　　*

पातशहानें गिळलेलें एक किल्ल्याचें माणिक त्याच्या जबड्यांत हात घालून काढून महाराज नुकतेच परत आले होते. त्या विजयानंतरचा आजचा पहिलाच दरबार होता; पण तो पाहून इंद्राचा गर्व देखील गळून गेला असता. या मराठी दरबारांत सर्वांच्या नसानसांतून राष्ट्रभक्तीचें अमृत सळसळत होतें.

प्रथमतः लढाईत कामाला आलेल्या शिपायांच्या मुलांबाळांची चौकशी झाली. एका आंधळ्या म्हातारीचा एकुलता एक मुलगा किल्ला घेतांना पडला होता. ती पुढें येतांच महाराजांना भडभडून आलें. लढाईत आपलें बरेंवाईट झालें तर मातोश्री जिजाबाईंना किती वाईट वाटेल, याचें मूर्तिमंत चित्र त्यांच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. ते सांत्वनपर स्वरानें म्हणाले, " आजीबाई, तुमची म्हातारीची काठी मीं हिरावून घेतली म्हणून तुम्ही माझ्यावर रागावणार नाहींना ? "

" महाराज, माझ्या मुलाचें सोनें झालें. "

महाराज गहिंवरून म्हणाले, " खरेंच, तुझी म्हातारीची काठी मराठ्यांच्या राज्याचा आधारस्तंभ होऊन राहिली आहे ! "

म्हातारीला पोटासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पहावें लागूं नये अशी व्यवस्था महाराजांनीं केली. म्हतारीनंतर जग किती विरोधपूर्ण आहे हें दाखविण्याकरितांच कीं काय, पांचसहा वर्षांचा एक मुलगा महाराजांपुढें आला. त्या मुलाची आई तो वर्षाचा असतांनाच त्याला सोडून गेली होती. लढाईत बाप कामाला आल्यामुळें तो आतां पोरका झाला होता. महाराज त्याला म्हणाले, " बाळ, तुझे बाबा कुठें आहेत ? "

" बाबा देवबापाकडे गेले ! "

" कशासाठीं "

" देवीनें सांगितलें म्हणून ! तिथें जाऊन ते किनई तरवार घेऊन येणार आहेत नि मला देणार आहेत ! मग मीहि लढायला जाईन. महाराज, तुम्ही मला चांगला घोडा द्याल ना हो ? "

महाराजांच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. त्यांनीं मळक्या कपड्याच्या पण तेजस्वी हृदयाच्या त्या बालकाला जवळ घेऊन कुरवाळलें. इतर सर्व माणसांची

व्यवस्था लागल्यावर ते संताजीकडे वळून म्हणाले, " संताजी, परवांच्या हल्ल्यांत तुम्हांला जबर जखम लागली आहे. त्या पराक्रमाचें बक्षीस म्हणून हा तेजस्वी मुलगा तुमच्या पदरांत घालतों. संताजी, तुमच्यासारख्या शूर नरवीरांनीं विंध्याला हात लावले आहेत. मी हा पोरका पण तेजस्वी मुलगा तुमच्याच देखरेखीखालीं ठेवणार आहें. त्याला अशी शिकवण द्या, कीं मोठेपणीं तो हिमालय पादाक्रान्त करील. "

खांद्यावरल्या जखमेची क्षिति न बाळगतां संताजी आज दरबारला आला होता. तो म्हणाला, " महाराज, आम्हीं तापी मागें टाकली. आपल्या पायाच्या पुण्याईनें पुढील पिढी अटकेच्या पैलतीरावर झेंडा रोंवील. पण इतक्या लहान मुलाचें संगोपन करणारें बायकोमाणूस माझ्या घरांत नाहीं. "

" नाहीं कसें ? मंजुळाबाई आहेत ना ? त्या काय जखमी नवऱ्याची शुश्रूषा करायची सोडून मठांतच स्वस्थ बसून राहतील ? "

इतक्यांत गंभीर शब्द ऐकूं आले.

" जय जय रघुवीर समर्थ ! "

" समर्थांची स्वारी आली वाटतें ? " असें म्हणत महाराज लगबगीनें उठले. समर्थ व त्यांच्या मागोमाग मंजुळा येत असलेली महाराजांनीं पाहिली. महाराजांनीं व सर्व लोकांनीं समर्थांना भक्तिभावपूर्वक वंदन केलें. महाराज म्हणाले, " आपल्या पायधुळीनें आजचा दरबार कृतार्थ झाला. सद्गुरूंनीं आसनावर बसण्याची कृपा करावी. कसें काय मंजुळाबाई, मठांत बरें चाललें आहेना तुमचें ? "

" शिवबा, मी आज तुझ्याकडे भिक्षेला आलों आहे. "

महाराज क्षणभर आश्चर्यचकित झाले. नंतर ते म्हणाले, " गुरुमहाराज, कामधेनु घरीं चालून आली असतांना तिला द्यायला—"

मंजुळा मनांत म्हणाली; " मी म्हणत होतें तेंच खरें ठरणार. एवढें मोठें राज्य असून केवढा गरीबीचा देखावा दाखविणें चाललें आहे. "

समर्थ म्हणाले, " शिवबा, तुला जी भिक्षा घालायाची असेल ती घाल. "

" गुरुमाऊलीपुढें मी काय बोलणार ? चिटणीस, स्वराज्याच्या सर्व सनदा इकडे घ्या पाहूं. "

आनंदानें प्रफुल्लित झालेल्या चेहेऱ्यानें महाराजांनीं राज्याच्या सनदा समर्थांच्या झोळींत घालून त्यांच्यापुढें साष्टांग नमस्कार घातला. एवढे वैराग्याचे पुतळे रामदासस्वामी ! पण राजांनीं घातलेली ही राज्य–भिक्षा पाहून त्यांचें अंतःकरण-देखील उचंबळून आलें. राजांना आपल्या हातानें उठवीत ते म्हणाले, " शिवबा, महाराष्ट्राची पूर्वपुण्याई बलवत्तर म्हणून शुक–भीष्मांचा जोडीदार असा राजा त्यांना मिळाला आहे ! "

" गुरुमहाराज, आतां मी राजा नाहीं. राज्याच्या सनदा आपल्या मालकीच्या आहेत. "

समर्थांनीं मंजुळेकडे पाहून म्हटलें, " कां मंजुळे, झाली का खात्री ? "

बिचारी मंजुळा काय बोलणार ? तिनें महाराजांच्या पायांवर लोटांगण घातलें व अश्रूंचा अभिषेक सुरू केला. महाराजांना हें कोडें कांहीं केल्या उलगडेना ! समर्थांनीं मंजुळेला उठविलें. मंजुळेचें मन गोंधळून गेल्यामुळें तिला बोलतां येईना. पण तिच्या डोळ्यांनीं तिचें निवळलेलें मन स्पष्टपणें दाखविलें.

समर्थ शिवबांकडे वळून म्हणाले, " शिवबा, या सनदा माझ्यासारख्या राम-दासाला काय उपयोगी ? सीतामाईनीं दिलेलें रत्न फोडून आंत रामनाम आहे कीं नाहीं हेंच मारुतिरायांनीं पाहिलें. "

" पण क्षत्रियाला भिक्षा परत घेतां येणार नाहीं. हेंहि गुरुमाउलीनें ध्यानांत आणावें. "

" तुझ्या निशाणावर ह्या माझ्या छाटीची स्थापना कर. आजपासून मराठ्यांचा झेंडा भगवा राहील व ' जोहारा ' ऐवजीं ' रामराम ' रूढ होईल. "

" समर्थांच्या आज्ञेबाहेर मी नाहीं. "

संताजीकडे वळून समर्थ म्हणाले, " संताजी, शिवबाप्रमाणें तुम्हींहि मला पूर्वी भिक्षा घातलीच आहे. ती भिक्षा आतां परत घ्या. शिवबासंबंधानें मंजुळेच्या मनांत यत्किंचितहि किंतु राहिलेला नाहीं. "

मंजुळेनें संताजीचें पाय धरलें, तिला उद्देशून शिवाजीमहाराज म्हणाले, "मंजुळा-वयनी, क्षत्रिय भिक्षा घालतात, पण मागत नाहींत. क्षत्रियांचें हें ब्रीद बाजूला ठेवून मी तुमच्याकडे भिक्षेची याचना करीत आहें. "

" महाराजांनीं मला असें हिणवूं नये. माझ्यासारखीला महाराजांना काय भिक्षा घालतां येणार ? "

" कां येणार नाहीं ? जगांत प्रत्येकापाशीं दुसऱ्याला देण्यासारखें कांहीं ना कांहीं तरी असतेंच. मलाहि स्वराज्यासाठीं तुमच्याकडून भिक्षा हवी आहे. "

" कोणती ? " मंजुळेनें उत्सुकतेनें विचारलें.

महाराजांनीं आपल्याजवळ उभ्या असलेल्या चिमुकल्या वीराला पुढें केलें व ते म्हणाले, " या पोरक्या पण पराक्रमी बालकाचा मातेप्रमाणें प्रतिपाल करण्याची भिक्षा मला स्वराज्यासाठीं पाहिजे. तुम्ही ही भिक्षा घातलीत तर स्वराज्यासाठीं प्राण अर्पण करण्याला कोणीहि कचरणार नाहीं ! "

मंजुळेनें त्या मुलाला आपल्या जवळ ओढलें व त्याला प्रेमभरानें कुरवाळून घट्ट पोटाशीं धरलें.

१९२७

# आंधळ्याची भाऊबीज

" चंद्रशेखर, झोंप येत नसली तर नुसते डोळे मिटून पड पाहूं."

" असलें बकध्यान मला कधींच साधत नाहीं काकू! झोंप येत नसतांना अंथरुणावर पडणें म्हणजे माणूस मेलं नसतांनाच त्याला चितेवर नेऊन ठेवणं आहे."

" इडापिडा टळो नि अमंगळ पळो" काकू घाबरून म्हणाल्या. " चंद्रा, तुला काळवेळ कांहींच नाहीं का रे?"

पलीकडच्या खोलींत निजलेली जान्हवी जागीच होती. ती चंद्रशेखरापाशीं आली आणि त्याच्या तोंडावर हात ठेवून म्हणाली, " दादा, तुझ्या तोंडाला आतां कुलुपच घातलं पाहिजे हं."

" दादाला उपाशीं मारायची चांगली युक्ति आहे ही जान्हवीताई!"

" मग तूं मरणाच्या अभद्र गोष्टी कां बरं काढतोस?"

" जीवनांत मरणाचें मीठ नसतं तर तें फार अळणी झालं असतं!"

" तुझीं हीं सुभाषितं नि तत्त्वज्ञानं तुझ्या गोष्टींत आणि नाटकांतच ठेवीत जा. आई कांहीं त्या गोष्टी नि नाटकं वाचायला येणार नाहीं."

" पण तुम्ही आहांतना ताईसाहेब. कॉलेजांत शिकतां आणि मरणाचं नांव आलें कीं मुळमुळू रडतां. निद्रा हा एक प्रकारचा मृत्यूच आहे असें कवि म्हणतात. ताईसाहेबांच्या कर्णपथावरून कधीं गेलं आहे का हें?"

" तुम्हां कवींना वेडे म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. आईनें झोंप येत नसली तरी नीज म्हटलें काय, नि तूं तेवढ्यावरून अमंगळ कल्पना—"

काकू भावा-बहिणींचें वाग्युद्ध ऐकत इतका वेळ स्तब्धच होत्या. त्या म्हणाल्या, " चंद्रशेखर, वाचून वाचून तुझे डोळे किती अधू झाले आहेत ते पहा बरं. त्यांतून तुझे डोळे येऊन महिनादेखील झाला नाहीं. "

" डोळे आले तेव्हां आल्याची भीति, आतां जास्ती वाचून ते जातील ही भीति ! मिळून काय, भीतिवांचून पाऊल उचलत नाहीं तुझं काकू. "

" चंद्रा, मुलं झाल्याखेरीज ही भीति तुला कळायची नाहीं बाबा. तूं जाडीजाडीं पुस्तकं वाचतोस नि दररोज भाराभर कागद लिहितोस ! त्यांत कांहींहि भीति आढळणार नाहीं तुला ! पण एक चिमणा जीव घरांतल्या पाळण्यांत हुं हुं करूं लागला कीं, त्याबरोबर तुझें मन मग वरखालीं होऊं लागेल. "

" त्याला स्वतःलाच मुलं कशाला झालीं पाहिजेत ? जान्हवीपेक्षां माझ्यावरच तुझी माया आहे कीं नाहीं ? माझंहि तसंच होईल. जान्हवीचा तरंग खुळखुळा वाजवून त्यांतून ' मामा ' ' मामा ' असे शब्द काढूं लागला—"

" अकरा तरी वाजून गेले असतील. चंद्रा, आज आदितवार ! तरी तुला आवंढा गिळायची फुरसद नाहीं. दुपारीं नाटकाला गेलास, नाटक पाहून आलास नि लिहीत बसलास. "

" एवढी गोष्ट पुरी करून निजतों हं मी काकू ! "

" चंद्रा, डॉक्टरनीं रात्रीं लिहावयाचं नाहीं म्हणून सांगितलं होतं ना ? "

" डॉक्टर डोळे तपासतात; पण हृदय नाहीं त्यांना तपासतां येत ! "

" खरंच चंद्रा, सकाळीं नवापासून संध्याकाळीं सहापर्यंत मानेवर खडा ठेवून कचेरींतलें काम करायचें—"

" काकू, तें केलंच पाहिजे पोटासाठीं ! या जगांत पुढं देव उभा राहिला तरी मागचं पोट कांहीं सुटत नाहीं. "

" मग असलं हें बिनफायद्याचं लिहिण्याचं नि वाचण्याचं काम करतोस तरी कशाला ? त्याच्यासाठीं नाटकं पहायला पाहिजेत म्हणे. मिळून काय डोळ्यांचा सत्यनाश नि जीवाला त्रास. "

" खरंच-दादा, त्या ' वीणे ' च्या संपादकानं काय सांगितलं रे ? "

" आज नाटकाला जाण्यापूर्वी त्याच्याचकडे गेलों होतों. तो वीणेचा खास अंक काढण्याच्या धांदलींत आहे. पुढल्या आदितवारपर्यंत वाचून ठेवतों, म्हणून सांगि-

तलन्. कांहीं नाहीं तरी गोष्टीला दहा रुपये देईल. झालं ! पन्नास गोष्टीचे पांचशें रुपये येतील. ताईसाहेबांच्या लग्नाच्या वरकड खर्चाला तरी तेवढे पुरतील ? ”

“ पण मला लग्नच नकोय्. ”

“ वा:, उद्यां बॅरिस्टर रत्नाकर तुला पहायला येणार ! अन् तूं तर मानापमानांतल्या भामिनीसारखं बोलायला लागलीस. त्यांनां धैर्यधर करायचा बेत आहे वाटतं ? ”

“ खरंच का रे येणार आहेत ते उद्यां ? का आपला मागच्या खेपेसारखा आशीर्वादच ? ” काकूंनीं उत्कंठेनें विचारलें.

“ अगदीं खरं, तेहि आले होते आज नाटकाला. मागच्या सोमवारीं कुठल्याशा सबजज्जाची मुलगी पहायला जावं लागलं त्यांना. उद्यां अगदीं खास येतों म्हणून सांगितलंय् ! ”

“ घरांत कोंडा नि मनांत मांडा. ते आले तरी जुळणार कसं रे बाबा ? ”

“ न जुळायला काय झालं ? ताई तर नक्षत्रासारखी सुंदर आहे. ”

“ नक्षत्रापेक्षां पांढऱ्या टिकल्यांनाच सध्यां जास्ती मान आहे, बाबा ! ”

“ रत्नाकर बॅरिस्टर आहेत ! ते कांहीं अडविणार नाहींत तसे ! त्यांतून माझ्या गोष्टी नि तीन नाटकं आहेतच कीं ! गेलीं चार वर्षें जाग्रणं केलीं तीं काय फुकट ? ”

“ कुळस्वामिनि शांतादुर्गे, माझ्या जान्हवीचं एवढं बरं केलंस तर मी दरवर्षी तुझी खणानारळांनीं ओटी भरवीन ”

“ काकू, त्यांनां कुठं बरं बसवावं उद्यां ? ”

“ तुझी पुस्तकांची खोली बरी आहे. पुस्तकं जरा नीट लावून ठेवलीं म्हणजे झालं ! ”

“ ताई करील तें काम. तिला सांगायला नकोच म्हणा ! मायेवीण रड नाहीं आणि—”

“ दादा, रात्र फार झाली आतां नीज ना तूं ! ”

“ मी निजलों तरी डोळा नाहीं लागायचा ! लागलाच तर स्वप्नांत सगळीं गोष्टींतलींच मंडळी येणार. त्यापेक्षां गोष्ट संपवून निजलेलेंच बरें, नाहीं कां ? ”

चंद्रशेखरानें समोरच्या खिडकींतून आकाशाकडे पाहिलें. प्रतिभासंपन्न कवीच्या मनांत चमकणाऱ्या कल्पनांप्रमाणें तारका चकमक करीत होत्या. पण व्यवहारी

जगाला त्यांचें सौंदर्य, त्यांचे दिव्य संदेश, त्यांचे मुग्ध नेत्रकटाक्ष यांची मुळींच किंमत नव्हती. तें या वेळीं डोळे झांकून स्वस्थ निजलें होतें. आकाशाचे काव्यमय डोळे जातात तेव्हांच जग डोळे उघडून त्याच्याकडे पहातें !

*　　　*　　　*　　　*

दुसरे दिवशीं नऊ झाले, साडेनऊ झाले, पावणेदहा झाले, तरी बॅरिस्टर रत्नाकरांचा पत्ता नाहीं. चंद्रशेखर तर त्यांच्या वाटेकडे डोळे लावून बसला होता. मधूनच त्यानें जान्हवीला हांक मारावी व म्हणावें, ' ताई, तूं पहा पाहूं जरा रस्त्यावर. मला किनई अलिकडे दूरचें मुळींच दिसत नाहीं. '

भावाचें हें भाषण थट्टेचें वाटून जान्हवी जागची हलली नाहीं म्हणजे तो म्हणे, ' इतक्यांतच लाजायला सुरवात केली वाटतं ? '

घड्याळांत दहाचे ठोके ऐकतांच चंद्रशेखरला गप्प बसवेना, " ताई, हा विलायती नियमितपणा पाहिलास ना ! तुझे भावी पतिराज हुंडा मागण्याच्या आधींच माझे बारा वाजविणारसं दिसतं ! "

इतक्यांत एक टांगा खडखड करीत आला व चंद्रशेखराच्या घरापुढें थांबला. टांग्याबरोबर क्षणभर जान्हवीचा श्वासहि थांबल्यासारखा झाला. दुसऱ्याच क्षणीं अरुणोदय होतांच अंतर्धान पावणाऱ्या तारकेप्रमाणें ती माजघरांत अदृश्य झाली. चंद्रशेखर रत्नाकराचें स्वागत करण्याकरतां पुढें जाऊन म्हणाला, " बॅरिस्टरसाहेब, एवढें साता समुद्रांत बुडून तुम्ही कोरडे ते कोरडेच ! विलायतेची यात्रा करून आलांत; पण नियमितपणा कांहीं आणलेला दिसत नाहीं तिथून. "

रत्नाकर—झाला खरा उशीर बोवा ! अगदीं पंजाब मेल सोडली होती; पण वाटेंत स्टेशनंच पडलीं खूप. त्याला काय करणार ?

चंद्रशेखर—स्टेशनं कसलीं काढलींत हीं ? मला वाटलं वाटेंत पक्षकार भेटले तुम्हांला ! मग कुठला वधूपक्ष आणि कुठलं काय ?

रत्नाकर—सकाळपासून फिरतोय् नुसता मुली पहात !

चंद्रशेखर—पुण्यांत मुलींचें प्रदर्शन बिदर्शन आहे कीं काय ?

चंद्रशेखरानें त्याला आपल्या पुस्तकांच्या खोलींत नेलें. हुश्श करून रत्नाकरानें आरामखुर्चीत आंग टाकून दिलें.

चंद्रशेखर—फार दमलेले दिसतां.

रत्नाकर—दमलेला म्हणून काय विचारतोस. एक मुलगी पाहणं म्हणजे एका काव्यसंग्रहाचं परीक्षण करणं ! सकाळपासून अवघ्या तीन तासांत मी असलीं सात परीक्षणं केलीं !—

चंद्रशेखर—आणि सात ग्रंथ आटपून आपली स्वारी आतां आठव्याकडे वळली आहे. रत्नाकर, तुमच्यासारख्या सुशिक्षितांना हें परवडतं तरी कसं ? मुली म्हणजे काय पायांतले जोडे का तोंड पुसण्याचे रुमाल ? या दुकानांत नाहीं चांगला माल तर चालले लगेच दुसऱ्या दुकानांत !

रत्नाकर—तूं म्हणतोस तें कळतं, पण वळत नाहीं ! काकासाहेबांचं फर्मान सुटलं कीं तें अमलांत आणावंच लागतं मला. त्यांनीं तर काय माघांत मला चतुर्भुज करण्याचा विडाच उचललाय् !

चंद्रशेखर—आणि लग्नाच्या दिग्विजयासाठीं तुम्हांला बाहेर सोडलंय ! पण तुमचा श्यामकर्ण आम्ही इथंच धरून ठेवणार ही खात्री बाळगा.

रत्नाकर—तुझ्यासारखा शाळासोबती मेहुणा झाला तर कुणाला नको होईल !

चंद्रशेखर—तुला–तुम्हांला नको झाला नाहीं म्हणजे झालं.

रत्नाकराला फार उशीर होईल म्हणून चंद्रशेखर आंत गेला. थोड्याच वेळांत तो व जान्हवी चहा आणि फराळाचें सामान घेऊन बाहेर आलीं. जान्हवी सुंदर दिसावी म्हणूनच कीं काय लज्जेनें तिच्या कपाळावर घर्मबिंदूंनीं सुंदर माळ गुंफली होती चंद्रशेखरानें व रत्नाकरानें आग्रह करतांच ती खुर्चीवर कशीबशी बसली; पण तिच्या चेहऱ्यावर नेहमींपेक्षां आज गुरुत्वाकर्षणाचा प्रभाव अधिक दिसत होता हें खास !

थोडीं मामुलीं व थोडीं मार्मिक प्रश्नोत्तरें होऊन रत्नाकर जावयाला निघाला. चंद्रशेखर त्याला पोंचवायला टांग्यापर्यंत गेला होता. जान्हवी सतृष्ण नजरेनें त्या दोघांकडे पाहत होती. ते दोघेंहि एकमेकांशीं बोलत होते. शेवटीं चंद्रशेखराशीं रत्नकरानें मोठ्या प्रेमानें हस्तांदोलन केलें व टांगा निघून गेला.

चंद्रशेखर स्वतःशींच विचार करीत आंत आला. "तुझी ताई फार बुद्धिवान् आहे असंच म्हणाला नाहीं ? ताईची बुद्धि तिच्या चेहऱ्याइतकी सतेज व डोळ्यांइतकी तीक्ष्ण आहे. ताईला ह्या चांगल्या स्थळीं देऊन मी काकांच्या ऋणांतून मुक्त होणार. काकांच्या आत्म्याला केवढा तरी आनंद होईल ! पण खर्चाला पैसे ? रत्नाकर

कांहीं हुंडाबिंडा मागणार नाहीं. वरकड रक्कम लागेल ती काय माझ्या गोष्टींना देखील मिळेल. ”

त्याच्या चेहऱ्यावर या विचारासरशी तारकेप्रमाणें मधुर स्मित झळकलें. त्यानें वर प्रखर रीतीनें प्रकाशणाऱ्या सूर्याकडे पाहिलें असतें तर त्यानें मात्र त्याला विचारलें असतें—“चंद्रशेखरा, काल रात्रीच्या तारका आतां कुठं आहेत ? ”

* * *

चंद्रशेखराच्या डोळ्यांत जान्हवी गाईचें दूध घालीत होती. काकूहि आज आदितवार असल्यामुळें थोडा वेळ चुलीची आराधना बंद करून तिथेंच येऊन बसल्या होत्या.

“ चंद्रा, बरं वाटतं आहे कारे त्या गाईच्या दुधानं ? मला बाई तुझ्या डोळ्यांची मोठी भीति वाटते. ”

“ माझ्या डोळ्यांची भीति ! म्हणजे ? मी तुझ्यावर कधीं तरी रागावलों आहे कां काकू ! ” चंद्रशेखर थट्टेच्या स्वरानें म्हणाला.

“ दादा. तुझं हें कोव्याचं वेड जाणार तरी कधीं ? ” जान्हवीनें विचारलें.

“ कोव्याधीश झाल्यावर ! ”

“ गोष्टींनीं नि नाटकांनीच कोव्याधीश होणार ना तूं ? फार झालं तर त्यांतलाच कोव्याधीश होशील झालें. बाजारांत भाजीइतकीं कांहीं फुलें खपत नाहींत. ”

“ चंद्रा, त्या रत्नाकरांनीं अद्याप कांहींच उत्तर नाहीं रे कळविलें ? सोमवार सोमवार आठ. उद्यां आठ दिवस होतील पाहून गेल्याला. ”

“ आपणच येऊन काय तें कळवितों म्हणून सांगितलं होतं त्यांनीं ! पण—”

“ पण काय न् बिण काय ? तूं जात असशील त्याच्या तुझ्या शाळेंतल्या मैत्रीवर ! पण लग्नाच्या गोष्टींत कुणी कुणाचा मित्र नाहीं. कशाला बाबा हवा आपणांला एवढा लहान तोंडी मोठा घांस ? स्वर्गातल्या गंगेला शंकरानें डोक्यावर बसविली म्हणून राजापूरची गंगा कां तिथं जाणार आहे ? ”

चंद्रशेखर हंसून म्हणाला, “ काकू, तूं तर आज जान्हवीताईकडे अगदीं काक-दृष्टीनें पाहाते आहेस. शुक्राच्या चांदणीला मातीची पणती म्हणतांना तुला कांहींच कसं ग वाटत नाहीं, काकू ? ”

“ बाबा, सगळं वाटतं ! पण वाटतं न वाटतं तोंच जगाकडे बघितलं, कीं मन

फाटतं. तुमचा मुंबईची परीक्षा दिलेला बी. ए. दोन हजारांना हलत नाहीं ! मग ह्या तर काय विलायतेला जाऊन परीक्षा देऊन आलेला ! ”

“ काकू, तूं अगदीं काळजी करूं नकोस. येत्या माघांत जान्हवीच्या लग्नाच्या गडबडींत तुला चहाचा घोट घ्यायलासुद्धां फुरसद मिळणार नाहीं. आणि ताईसाहेब बॅरिस्टरीणच होणार ही माझी अगदी काळ्या दगडावरील रेघ ! ”

चंद्रशेखर उठला व कपडे करून बाहेर जावयाला निघाला. जातांना तो जान्हवीला म्हणाला, ‘ ताई, रत्नाकर आलेबिले तर त्यांना मी घटकाभरांत परत येतोय् म्हणून सांग हं. त्या ‘ वीणे ’ च्या संपादकाला भेटून येतों ,मी. लाजायला नको कांहीं इतकं. अबोल्याची गोडी लग्नानंतर असते ! आधीं नाहीं बरं ताईसाहेब.”

चंद्रशेखर ‘ वीणे ’च्या कचेरींत पोंचला. संपादकाचें टेबल पोस्टाच्या पेटीप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हेच्या कागदपत्रांनीं भरून गेलें होतें. ते विडीच्या धुरांत त्यांतील कांहींचें निरीक्षण करीत होते. चंद्रशेखराला पाहतांच ‘ या बसा, ’ म्हणून ’ त्यांनीं जवळची खुर्ची पुढें केली.

चंद्रशेखर—( थोडा वेळ थाबून ) गोष्टी आपण वाचल्यात का ?

संपादक—चाळून पाहिल्या ! पांच सात बऱ्या आहेत. बऱ्या म्हणजे चालण्यासारख्या ! पण—

चंद्रशेखर—पण काय ?

संपादक—त्या लोकप्रिय होण्यासारख्या नाहींत सध्यां ! त्यांत नायक नायिका आहेत; पण त्यांचा शृंगार कुठें नाहीं. तुमच्या सात गोष्टींत एकहि खून नाहीं ! मृत्यु सगळे दोनतीनच आहेत नि ते तापासारख्या बारीक रोगांनीं ! तुमच्या एकाहि पात्राला पिस्तुलाची माहिती दिसत नाहीं. अहो, ब्रिटिश सरकारनं हत्यारांचा कायदा केला असला तरी गोष्टींना कांहीं लागू नाहीं तो !

चंद्रशेखर—पण मी साधे दिसणारे सामाजिक प्रश्न—

संपादक—तुमचे ते प्रश्न आणि त्यांचीं उत्तरें यांचा खल करायला वाचक काय शाळेंतले विद्यार्थी आहेत ? त्यांना सेन्सेशन हवं ! छाती धडधड उडावयाला लावणारे प्रसंग, अंगावर कांटा उभा करणारीं वर्णनें, तोंडांत बोट घालायला लावणारे अत्याचार !—या सात गोष्टींत एकहि चुंबन नाहीं. तुमच्या सर्व नायकनायिकांचं बाळपण शुक्राचार्य, भीष्माचार्य, मारुति वगैरेंच्या तालमींत गेलेलं दिसतं. चुंबन व आलिंगन ह्या वाचकांवर विजय मिळविणाऱ्या महांकाळी तोफा आहेत !

अहो, गोष्टींतल्या एका मुक्यानें जें काम होतं तें लेखकाच्या पन्नास पानांच्या वाचाळपणानं होत नाहीं.

चंद्रशेखर—पण कलेची निर्मल गंगा कुणीकडे आणि वाङ्मयाच्या नांवाखालीं खपणारं हें गढूळ ओढ्याचं पाणी कुणीकडं?

संपादक—अशा तऱ्हेनं गोष्टी दुरुस्त कराल तर प्रत्येक गोष्टीला दहा रुपये देऊं. गोष्टींत व्यभिचार करणाऱ्या पात्रांनां नरकांत पडावं लागलं तरी तीं रंगविणारा इथं स्वर्गसुखांत लोळतो हे विसरूं नका.

चंद्रशेखर—वेश्येची शेज सजविण्यापेक्षां फुलांनीं रानांत सुकून गेलेलें काय वाईट?

चंद्रशेखर आपल्या गोष्टी घेऊन 'वीणे'च्या कचेरींतून निघाला. 'मदिरा, वेश्या व कला यांची किंमत बहुजनसमाजाला सारखीच वाटावी ना? दारूप्रमाणें वाङ्मयानें निशा आणिली म्हणजे झालें! जागृत करणें हा ज्याचा धर्म त्यानेंच निशा आणायची! पशुवृत्ति उत्तेजित करणाऱ्या गोष्टी पाहिजेत; देवपदाला नेणारे विचार नकोत! हिमालयाची हवा नको; तळघरांतलें वातावरण हवें. चुलीला लावण्याकरितां कल्पवृक्षाचीं लांकडें होतात आणि विषवृक्षाच्या फळांवर लोकांची उडी पडते.'

त्याच्या मनांत हेच विचार एकसारखे घोळत होते.

मग्न व क्षुब्ध हृदयानें चंद्रशेखर घराकडे येत होता. वाटेंत त्याच्या पेठेचा पोस्ट-मन् त्याला भेटला, त्यानें एक पत्र त्याला दिलें. पत्र रत्नाकराकडून आलें होतें, हें लिफाफ्याच्या डाव्या बाजूचा कंसच दाखवीत होता. थरथर कांपणाऱ्या हातानें चंद्रशेखरानें फोडलें.

"...काका करतील ती पूर्वदिशा हें तुला माहीत आहेच. कमींतकमी पांच हजार रुपये देणाराचीच मुलगी करण्याचा त्यांनीं कृतनिश्चय केला आहे. त्यांचं बोलणं म्हणजे ब्रह्मलिखीत! त्यांच्याविरुद्ध ब्र काढणेंहि मला शक्य नाहीं. इकडे आड तिकडे विहीर अशी माझी स्थिति झाली आहे. तुझी सांपत्तिक स्थिति मला माहीत आहे. पण काय करूं? इंग्लंडला पाठवून काकांनींच मला पोपटपंची शिक विली आहे. त्यांच्या सोन्याच्या पिंजऱ्यांतून उडून जाणं मला शक्य नाहीं. माझ्या या दुबळेपणाबद्दल मला क्षमा कर. पत्राचं उत्तर मात्र ताबडतोब दे. कारण-मुलगी ठरली नसली तरी माघांतली लग्नाची तिथि काकांनीं आधींच ठरवून टाकिली आहे."

रत्नाकर हुंडा घेणार नाहीं आणि जान्हवी त्याला पूर्णपणें पसंत पडली आहे या समजुतीनें चंद्रशेखराचा दरिद्री कल्पनापर्वत आतांपर्यंत आकाशांत भराऱ्या मारीत होता व जान्हवीला आपल्या स्कंधावर बसवून रत्नाकराकडे नेऊन पोंचवीत होता. हें पत्र त्याला वज्राघातासारखें वाटलें. त्यानें एका क्षणांत त्याच्या कल्पानापर्वताचे पंख कापले. क्षणभरच चंद्रशेखराला भर दुपारीं रस्त्यांत आपल्या भोंवती अंधार पडल्यासारखें वाटलें. दुसऱ्याच क्षणीं तो भानावर आला. 'कांहीं हरकत नाहीं. ताईसारखं रत्न कांहीं एखाद्या माकडाच्या गळ्यांत बांधायचं नाहीं. तें राजाला द्यायचं म्हटलं कीं दरबारांत प्रवेश करून घेण्याकरितां भालदार चोपदारांच्या हातावर चिरीमिरी ठेवलीच पाहिजे. काकांनीं मला लहानाचं थोर केलं, वाङ्मयाची गोडी मला लाविली. हे उपकार मला ताईला सुस्थळीं देऊन फेडलेच पाहिजेत. तीन नाटकं तर आहेत. पांच हजार रुपये काय हां हां म्हणतां जमतील!' त्यानें आनंदी मुद्रेनें वर पाहिलेंच. प्रखर सूर्य वर प्रकाशत होता आणि पृथ्वी त्याच्या तापानें 'हाय हाय' म्हणत होती. चंद्रशेखरानें खालीं मान करतांच पृथ्वीनें जणुं काय त्याला विचारलें, 'कविराया, सूर्याप्रमाणं चंद्राला कुणी अर्घ्यै दिलेलीं तूं पाहिलीं आहेस काय रे?'

* * * *

चंद्रशेखरानें घरीं येतांच 'काकासाहेबांच्या इच्छेप्रमाणें जान्हवीताईबरोबर पांच हजार रुपये देण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां माझें नक्की उत्तर येण्याच्या आधीं दुसरीकडे कुठेंहि जुळवूं नये. आठ दिवसांच्या आंत आपणाला नक्की काय तें कळवितों.' अशा अर्थाचें पत्र रत्नाकराला पाठविलें.

जेवण होतांच तो बाहेर जायला निघालेला पाहून काकू म्हणाल्या, "असा भर उन्हाचा कुठें निघालास बाबा? आधीं डोळे अधू! त्यांतून हल्लीं तर ते नेहमींच दुखतात. कमी दिसतं म्हणूनहि म्हणतोस! उन्हानं अधिक अपाय नाहीं का होणार?"

"जान्हवीताईच्या लग्नाचं जुळलंय काकू. रत्नाकराकडून निरोप आलाय्. तेव्हां तिकडे जाऊन येतों. आपला पडला वधूपक्ष, आपल्याला ऊन काय नि पाऊस काय!"

चंद्रशेखर आपल्या नाटकाची वही घेऊन बाहेर पडला होता. कंपनींत फार जाणें येणें असलेल्या एका स्नेह्यामार्फत तो मालकांच्याकडे गेला. त्यांनींहि तात्काळ नाटक ऐकण्याचें कबूल केलें. "जान्हवीताईचे ग्रह उच्चीचे आहेत" असें म्हणत

चंद्रशेखरानें तें संपूर्ण वाचून दाखविलें. वाचन संपतांच त्यानें उत्कंठेनें विचारलें
" कसं काय वाटलं तुम्हांला ? "

" आहे, बरं आहे; चालण्यासारखं आहे. पण—"

" पण काय ? "

" तुम्ही नवशिके असल्यामुळें थोड्या चुका झाल्या आहेत त्यांत. ' देशाच्या पायीं ' हें नांव दिलं आहे तें ठीक आहे. पण आंत ' नाथ ' ' प्रिये ' हे शब्द जितके जास्त येतील तितके चांगले ! "

चंद्रशेखर—शृंगाराला या नाटकांत जागाच नाहीं.

मालक—' अहो, जागा करून दिली पाहिजे ! आगगाडीच्या डब्यांत तुम्ही आम्ही नाहीं का एकमेकांच्या सोईसाठीं जागा करून देत ? पहा, या नाटकाला शृंगाराची थोडी फोडणीं द्याल—

चंद्रशेखर—कला म्हणजे मूर्तिमंत सौंदर्य. त्याच्यावर अशा रीतीनें डाग पाडणं—

मालक—' शशिमाजी लांछनाची बहु शोभा दिसते ! ' अण्णा किर्लोस्करांचं काव्य आहे हं हें. शृंगाराचे प्रवेश घाला. एक हजार रुपये देऊं या नाटकाला.

स्वतःच्या अपत्याचे हातपाय तोडण्याइतकीच ही सूचना भयंकर वाटून चंद्रशेखर मालकांचा निरोप घेऊन उठला. दुसरे दिवशीं आठ दिवसांची रजा घेऊन त्यानें मुंबईची दुपारची गाडी गांठली, काकूंनीं मुंबईला जाण्याचें कारण विचारतांच " रत्नाकरांचे काका मुंबईला आहेत. लग्नाच्या बाबतींत त्यांच्याशीं बोलणें करायला जातों ! " म्हणून त्यानें सांगितलें.

' दैवविलास ' ' व महात्मा बुद्ध ' हीं आपलीं दोन्ही नाटकें तेथील प्रमुख मंडळ्यांना त्यानें दाखविलीं. त्याच्या लेखनकौशल्याविषयीं मंडळ्यांचें मत अनुकूलच झालें. फक्त ' दैवविलास ' हें शोकपर्यवसायी नाटक आनंदपर्यवसायी करावें असें पहिल्या नाटक मंडळीनें सुचविलें. दुसरीनें ' महात्मा बुद्ध ' यशस्वी होण्यासाठीं त्यांत चार-पांच विनोदी पात्रें घालण्याचा आग्रह केला. ' लोक पैसे देऊन नाटक पहायला येतात तें कांहीं रडण्यासाठीं नाहीं ' हा पहिल्या मंडळीचा मुद्दा होता. ' विनोदावांचून नाटक रंगत नाहीं ' हा दुसऱ्या मंडळीचा अनुभव होता. त्यांच्या या सूचना ऐकून चंद्रशेखर खिन्न अंतःकरणानें बिऱ्हाडीं आला. ' कला ! विशुद्ध कलेला या जगांत कोणीच त्रातापाता नाहीं कां ? चंद्राकडे एरवीं फार थोडे लोक पाहतात ! पण त्याला ग्रहण लागलें कीं तें पहाण्याला मात्र गर्दी होते. ध्रुवाला या जगांत

कोणीच विचारीत नाहीं. पण साडेसातीच्या भीतीनें शनीला दानें करणारे पुष्कळ भेटतात. काय करूं? कला कीं जान्हवी? कुणाला टाकूं?' असे विचार करीत कपाळ हातांनीं घट्ट धरून तो किती वेळ बसला होता. पण बसून त्याच्या मनाला लागलेल्या इंगळ्या थोड्याच कमी होणार होत्या?

"कलेला चिकटून राहिलों तर ताईचा जन्म फुकट जातो. नाहीं, माझ्या घरांतल्या चालत्या बोलत्या कलेची हुंड्याच्या अग्नींत मी आहुति देणार नाहीं. माझ्या लाडक्या अपत्यांचाच मी ताईसाठीं बळी देईन."

'दैवविलास' व महात्मा बुद्ध' मंडळ्यांच्या सूचनांप्रमाणें दुरुस्त करून देण्याचें त्यानें कबूल केलें. दोन महिन्यांच्या आंत दोन्ही नाटकें तयार करून देण्याचा व नाटकांच्या प्रती हातांत पडतांच प्रत्येक नाटकाबद्दल मंडळीनें ग्रंथकर्त्याला १५०० रुपये देण्याचा करार उभयपक्षीं झाला. रात्रीच्या गाडीनें चंद्रशेखर पुण्याला जायला निघाला. तारका नेहमींप्रमाणें आकाशांत चमकत होत्या. एकदम त्याची नजर आकाशांतून पडणाऱ्या एका ताऱ्याकडे गेली. त्यानें करुणहास्य केलें.

* * * *

घरीं आल्याबरोबर जान्हवीताईचें लग्न रत्नाकराशीं ठरल्याचें चंद्रशेखरानें काकूंना सांगितलें. "तुझ्यासारखा धुरंधर भाऊ मिळाला म्हणूनच तिला असलं स्थळ लाभलें!" काकू गहिंवरून म्हणाल्या.

त्याच दिवशीं चंद्रशेखरानें दुसरीकडे एक खोली भाड्यानें घेतली. आजपासून दररोज संध्याकाळीं आपण रत्नाकराकडेच जेवणार व दररोज रात्रीं तिकडेच रहाणार असें त्यानें काकूंना व जान्हवीला सांगितलें.

"मेव्हण्यामेव्हण्यांचं आतांपासूनच मेतकूट जमलं वाटतं?" काकू हंसत हंसत म्हणाल्या.

"उद्यां लग्नांतलीं पक्वान्नं बिघडलीं तर संग्रहीं असलेल्या या मेतकुटाचा उपयोग होईल." चंद्रशेखरानें हंसत उत्तर दिलें.

त्या दिवसापासून त्यानें रात्रीचा दिवस करावयाला सुरवात केली. पन्नास गोष्टींचे पांचशें रुपये व तीन नाटकांचे साडे चार हजार रुपये मिळून पांच हजार त्याला उभे करावयाचे होते. भक्तानें भक्तिभावानें बांधलेल्या देवालयाला नायकिणीच्या बंगल्याचें स्वरूप देण्याची एखाद्या संस्थानिकाला लहर यावी आणि त्यानें तें काम त्याच भक्ताला करावयाला लावावें, अशांतला चंद्रशेखरचा प्रकार झाला होता.

हृदयाच्या रक्तानें पल्लवित केलेल्या कलालतेवर त्याला कुऱ्हाड चालवावी लागत होती. सौंदर्याच्या ताजमहालाचें घोडशाळेंत त्याला रूपान्तर करावें लागत होतें. ‘केवढं मोठं पाप मी करीत आहें.’ तो पुनःपुन्हां स्वतःशींच म्हणे. आतांच्या आतां जाऊन या नाटकांच्या व गोष्टींच्या वह्या नदींत नेऊन बुडवूं का? पण ह्या बुडविल्या तरी आंतली आग कशी विझणार? कीं मी उडी घेऊन ही आग—कलेची राखरांगोळी करणारी ही आग—विझवून टाकूं? हे विचार मनांत येतांच त्याच्या-पुढें जान्हवीची हंसरी व प्रेमळ मूर्ति उभी राही. जान्हवीसाठीं जगावें व मरायचें असलें तर जान्हवीसाठींच मरावें असें त्याचें भातृप्रेम त्याला सांगूं लागे. आपल्या कलेला छिन्नविच्छिन्न करतांना जीं आसवें डोळ्यांत उभीं राहतात तींच जान्हवीची लग्नमाळ गुंफणार आहेत अशी तो आपल्या मनाची समजूत घाली.

‘जान्हवीचं लग्न आज केलं पाहिजे असं थोडंच आहे?’ त्याचें कलाभक्त मन सांगूं लागे. पण लगेच कृतज्ञता जागी होई व म्हणे, काकूंची जान्हवी एकुलती एक मुलगी! त्यांना नातवंड पहाण्याची केवढी मोठी हौस. जान्हवीचं लग्न स्वार्थासाठीं तूं लांबणीवर टाकलंस तर ती हौस कधींतरी पुरी होईल का? लहानांनीं वडील माणसांसाठीं स्वार्थत्याग केलाच पाहिजे. आज जान्हवीचं लग्न नाहीं केलंस म्हणून उद्यां काय कोण कुबेर अगर बृहस्पति तिला आपल्या पदरांत घेणार आहे? हुंड्याचें वजन वधूपक्षाच्या पारड्यांत घातल्याखेरीज वरपक्षाचं जमीन धरून बसलेलें पारडें ज्या समाजांत हालत नाहीं, तिथं तूं उद्यां तरी जान्हवीचं लग्न कसं करणार? काकांच्या प्रेमाची फेड तूं अशीच करणार वाटतं? पन्नादाईनं धन्यासाठीं पोटच्या गोळ्याचा बळी दिला अन् तूं कलेचा बळी द्यायला तयार नाहींस, हीच का तुझी मायाममता?’

कृतज्ञतेचा व प्रेमाचा शेवटीं जय होई आणि त्यांच्या बलावर चिलयाला कांडणाऱ्या चांगुणेप्रमाणें चंद्रशेखर आपल्या कलाप्रधान वाङ्मयाला कुटून त्याचा लोकाभिरुचीला आवडेल असा मालमसाला तयार करी.

चंद्रशेखराचें हें काम सुमारें दीड महिना चाललें होतें. या दीड महिन्यांत त्याचा डोळ्याला डोळा लागला नाहीं. मधून मधून त्याचे डोळे सुजल्यासारखे होऊं लागले. एकदोनदां काकूंनीं व जान्हवीनें त्याला तसें बोलून दाखविलेंही. “चार मित्रमंडळी जमली कीं गप्पाष्टकें सुरू होतात. जाग्रणें आहेतच दररोज. कोंबडा आरवेपर्यंत आमचा आरडाओरडा सुरू असतो. ताईसाहेब एकदां रत्नाकराच्या

घरीं गेल्या म्हणजे मग मला स्वस्थ झोंप मिळणार. त्या जाईपर्यंत रत्नाकरानं मला ओलीसच ठेवून घेतलं आहे " असें चंद्रशेखर त्यांचें समाधान करी. जान्हवीला तें पुरतेपणीं पटत होतें असें नाहीं; पण तिला अधिक कांहींच बोलतां येत नसे.

माघ महिन्यांत सुमुहूर्तावर लग्न झालें. नक्षत्रदर्शनाला वधूवर गेले त्या वेळीं चंद्रशेखरहि बरोबर होताच. " चंद्रशेखर, लवकरच तुलाहि नक्षत्रदर्शन करायचंय् आतांच पाहून ठेव म्हणजे त्या वेळीं चटकन् ओळखतां येईल " रत्नाकर थट्टेनें म्हणाला. चंद्रशेखरानें वर पाहिलें. डोळे बारीक करून पाहिलें, ताणून पाहिलें—पण त्याला ध्रुव अंधुक देखील दिसला नाहीं !

* * * *

" चंद्रशेखर, लग्नानंतरची ही आपली पहिलीच भेट नाहीं ? "

" होय." रत्नाकराचा हात हातांत घेऊन चंद्रशेखर म्हणाला. " पण तुझ्या भेटीचा आनंद हृदयांत वाहून नेण्याला माझे डोळे आतां समर्थ नाहींत. अंधार ! सारा अंधार ! रत्नाकर, रात्रीच्या आयुष्यांत महिन्यांतून एकदांच अमावास्या येते. पण यापुढें वर्षेंच्या वर्षे माझ्या आयुष्यांत अमावास्याच आहे. बाकी देवानें डोळे दिले असून समाज लाखों लोकांना पहायला देत नाहीं. या जीवांपुढं माझ्यासारख्या एका आंधळ्याची काय कथा ? "

" तत्त्वज्ञानाच्या मुलाम्यानें दुःखाचं भयाण रूप कधीं झांकता येतं कां ? पण चंद्रशेखर, हें तुझं आंधळेपण इतकं अचानक कसं आलं ? "

" अचानक कसलं ? तुझ्या लग्नाच्या दिवशीं तूं मला नक्षत्र पहायला सांगितलंस. पण तें कांहीं मला दिसलं नाहीं. दुसरेच दिवशीं मी डॉक्टरांच्याकडे गेलों ते म्हणाले, ' एक महिना अगोदर जर आलां असतां तर डोळे बांधून ठेवून कांहीं इलाज करतां आला असता.' त्यांनीं खूप उपचार केले ! पण फुटकी नाव कोण तारणार ? "

जान्हवी ओंवाळणी घेऊन आली. तिला कांहीं महिने गेले होते, परंतु पहिलाच दिवाळसण असल्यामुळें काकूंच्या समाधानासाठीं चंद्रशेखरानें दिवाळींत सहकुटुंब येण्याविषयीं दसऱ्याच्या दिवशीं रत्नाकराला पत्र लिहिलें होतें. आपलें स्वतःचें शेवटचें अक्षर याच पत्रांत त्यानें पाहिलें होतें.

जान्हवी—आजचं आपलं पहिलं नाटक पहातां येत नाहीं म्हणून दादा अगदीं उदास झाला आहे.

चंद्रशेखर—छेः ! डोळे गेल्याचं दुःख मला झालं आहे खरं ! पण तें उद्यां तुझा तरंगम्मला पहायला मिळणार नाहीं म्हणून. नाटकाविषयीं म्हणशील तर देवानं माझे डोळे अगदीं वेळेवर घालविले !

जान्हवी—ऐकावं तें नवलच बाई !

चंद्रशेखर—नवल कसलं ? आज माझ्या कलेचे रंगभूमीवर जे धिंडवडे निघणार आहेत ते पहाण्याच्या आधींच देवानं माझे डोळे नेले, हें केवढं भाग्य !

जान्हवी—( त्याच्या हाताला धरून ) दादा, इथें पाटावर बैस मी ओवाळतें हं.

चंद्रशेखर—माझ्याच घरीं आंधळ्याची भाऊबीज आहे असें नाहीं. वाङ्मयांत, कलांत, जीवनांत अहोरात्र आंधळ्याचीच भाऊबीज चालली आहे. आंधळ्या जगाला सौंदर्याचा कुंकुमतिलक आणि सत्याच्या अक्षता लावून कला ओंवाळूं लागते, पण बंधुराज ओवाळणी काय घालतात ? तर तिचें नाक कान कापण्याची शिक्षा !

चंद्रशेखरला आपला मनःक्षोभ आवरेना. तो करुण स्वरानें म्हणाला,

**अवडंबरलीं ढगें कितितरि**  
**रविकिरणाचा चूर होतसे**  
**मोहर सगळा गळुनि जातसे**

पुढें त्याच्या तोंडांतून शब्दच निघेना. जान्हवीनें आरती ओवाळली. त्या प्रतिभा-संपन्न कलावंताचें पिळवटलेलें हृदय अश्रूंच्या रूपानें तिच्या तबकांत उतरलें !

१९२६

# लीलावती

मुरलीधराच्या हातांतील वेणूनें त्याच्यापुढें बसलेल्या वेणूला हां हां म्हणतां भारून टाकलें. तें अलगूज नसून जणुं कांहीं यक्षिणीची कांडी होती. क्षणांत ती खोली यमुनेवरल्या लताकुंजाप्रमाणें भासूं लागली. खिडकीबाहेर दिसणारें मावळतें ऊन चांदण्याप्रमाणें वाटूं लागलें. एका निराळ्याच सौंदर्यसृष्टींत आपण नुकत्याच उमलणाऱ्या कळीप्रमाणें अर्ध्या मिटल्या डोळ्यांनीं सरस्वतीचें वीणावादन ऐकत आहों असा वेणूला क्षणमात्र भास झाला. क्षणांत यमुनातीराची आठवण होऊन आपण राधेप्रमाणें वेडावून तर गेलों नाहीं ना असाहि विचार तिच्या मनांत आला. दोघांच्याहि या तंद्रीचा भंग मामांच्या ' पेढे मुरलीधर, पेढे ' या हर्षोत्फुल्ल अभिनंदनानें केला. मुरलीधराचा प्रवेश परीक्षेंत तिसरा नंबर आला असून त्याला दुसरी जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्तिहि मिळाली होती. सृष्टीवर प्रथमतःच सूर्योदय झाला तेव्हां जी शोभा दिसली असेल तिनें मुरलीधराचें मन भरून गेलें. डोळे उघडे असून त्याला मधुर स्वप्नें दिसूं लागलीं. प्रोफेसराच्या वेषांत व्याख्यान देणारी स्वतःची मूर्ति त्याच्या डोळ्यांपुढें उभी राहिली. पहिल्या दिवशीं कॉलेजमधून आपण घरीं परत आल्यावर दारांतच मधुरस्मितानें कोणी तरी आपलें स्वागत करीत आहे असें एक अस्पष्ट चित्र त्याच्या मनापुढें नाचूं लागलें तें ' कोणी ' कोण असावें ? मनुष्यानें डोळे फाडफाडून पाहिलें तरी उद्यांच्या झिरझिरीत रेशमी पडद्याआडचें सुद्धां कांहींएक त्याला दिसत नाहीं ! मग दूरच्या भविष्याच्या गगनचुंबी पर्वताआड काय लपलें आहे याची त्याला कशी कल्पना करतां येणार ?

* * * *

मुरलीधर हातांनीं बांधाबांध करीत होता व डोळ्यांनीं पूर्वी कधींहि न पाहिलेलें कॉलेज पहात होता. हंसऱ्या चेहऱ्यांनीं फुललेल्या विद्यार्थ्यांच्या वर्गांत हुषार विद्यार्थी

या नात्यानें सर्वांचे डोळे आपल्याकडे कसे खिळून राहतील याचें त्याला स्वप्न पडत होतें. खोलींत वेणू आली व ' भाऊ, दशम्यांबरोबर तोंडी लावायला काय हवें तुला ? ' असें तिनें विचारलें, तेव्हांच तो कल्पनेच्या जगांतून बाहेर आला. वेणूच्या आवाजांत एक प्रकारचा कंप होता. मुरलीधरला तो चटकन् कळला. तो हंसत हंसत म्हणाला, " वाः ताई ! तूं बायकांचें हत्यार उपसलेंसच वाटतें शेवटीं ? अशी रडतेस काय खुळ्यासारखी ? " इतका वेळ वेणूनें आपलें रडें कसेंबसें आंवरून धरलें होतें ! पण मुरलीधराचे शब्द ऐकतांच ती ओक्साबोक्सीं रडूं लागली. मुरलीधर तिच्याकडे वेड्यासारखा पाहूं लागला. गेल्या दोन वर्षांत तो सुट्टींत येऊन मामांकडे रहात असे व वेणूला शिकवीत असे. त्यांचा ऋणानुबंध काय तो एवढाच. शाळेंत चार वर्षे वेणू ज्याच्या हाताखालीं शिकली त्या शिक्षकासाठीं ती थोडीच रडली असेल ? मग या गंगायमुना कां ? आपल्यांत असें काय आहे कीं, ज्याच्यासाठीं आपल्या या दूरच्या मामेबहिणीनें रडावें ? या विचारांनीं मुरलीधराचें हृदय एका अस्पष्ट पण गोड भावनेनें व्याकूळ झालें. वेणूच्या अश्रूंनीं त्याच्या हृदयावर एक मूर्ति स्थापून तिला अभिषेक केला. दुसऱ्याला हंसणें व स्वतःसाठीं रडणें हा जगाचा नियम आहे. अशा आप्पलपोट्या जगांत आपल्यासाठीं रडणारें दुसरें कोणी तरी आहे ही भावना मनाला केवढें समाधान देते ! ' ताई, रडूं नये असें ' हे शब्द मुरलीधरानें कसेबसे काढले. पण हे शब्द तोंडांतून बाहेर पडतात न पडतात तोंच त्याच्याहि डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. मनोराज्यांत महत्त्वाकांक्षेच्या वारूवर आरूढ होऊन विहार करणारा मुरलीधर पण तोहि एखाद्या लहान मुलीसारखा मुसमुसून रडूं लागला.

जगांत दुसऱ्याला हंसण्याइतकें सोपें आणि दुसऱ्यासाठीं रडण्याइतकें कठिण काम नाहीं. खऱ्या कवीप्रमाणें अश्रूही जन्मालाच यावे लागतात, मग दूरच्या नात्याच्या तुटक्या सुतानें बांधलेलीं हीं दोन मुलें कां रडत होतीं ? सतरा वर्षांचा मुरलीधर व चौदा वर्षांची वेणू यांनीं एकमेकांसाठीं रडावें असें काय झालें होतें ?

विकसित झालेल्या कलिकेला वेलीच्या रसांइतकीच सूर्यकिरणांची व भ्रमरांची आवड उत्पन्न होते. मुलां--मुलींनाहि त्यांच्या मुग्धपणाच्या काळांत स्नेहाची अशीच अपेक्षा असते. संसाराच्या कल्पना त्यांच्या मनाला शिवतहि नाहींत. पण प्रेमासाठीं प्रेम करण्याची स्फूर्ति त्यांना यावेळीं होऊं लागते. चौदा वर्षांची मुलगी व सोळा-सतरा वर्षांचा मुलगा यांचें मन संधिप्रकाशाप्रमाणें मुग्धमधुर असतें. व्यवहारांत प्रेम करतां येत नसलें, तरी नुसती प्रेमाची कल्पना तरी करीत बसावें असें त्यांना

वाटूं लागतें. पुरुषांमध्यें समाजसेवा व बायकांमध्यें मातृप्रेम यांचीं जी स्वाभाविक बीजें असतात त्यांना या वेळींच अंकुर फुटतो. पण अगदीं याच वयाला मुलां-मुलींना विलक्षण परकेपणानें वागविण्यांत येतें. सोळासतरा वर्षांच्या मुलाला आईच्या कुशींत शिरून दुःखाला वाट मोकळी करून देतां येत नाहीं. अगर चौदा वर्षांच्या बहिणीला वडील भावाच्या अंगावर लोळून आपला आनंद द्विगुणीत करतां येत नाहीं. त्यांचा उत्साह वाढलेला असतो. पण तो कृतिरूपानें व्यक्त होणें शक्य नसल्यामुळें हृदयांत शिरतो व त्याला उत्सुक आणि उत्कंठित करून उचंबळवून टाकतो.

मुरलीधर व वेणू यांचेंहि असेंच झालें असावें. रडण्याचा भर ओसरतांच मुरली-धर म्हणाला, " ताई, इतक्या गंगायमुना वाहूनहि आम्हीं अजून बुडालों कसें नाहीं ? "

" या गंगायमुना बुडवीत नाहींत."

" माझ्या गळ्याची शपथ आहे तुला."

" मी काय मुद्दाम रडतें आहे ? मला आतां करमणार नाहीं मुळींच आणि शिकविणार तरी कोण पुढें ? "

" शिकविणार तिकडची स्वारी. येत्या वैशाखांत मामा तुला एक गुरुजी देणार आहेत. या गुरुंना फी मुळींच द्यायला नको ! ते येतील ते तुझा हात हातांत घेऊन शिकवायला लागतील. एखादे वेळीं शिक्षा केलीच तर गालगुच्चाची ! "

" मामा कांहीं करोत ! पण तुला सुट्टींत आलेंच पाहिजे नि तुझी आठवण म्हणून कांहीं तरी देऊन गेलं पाहिजे हं ? "

" आठवण काय देणार ? "

" तुझी ती कविता उतरून दे म्हणजे झालें. ती पाठ करीन नि तुझी आठवण झाली म्हणजे म्हणत बसेन."

" पण तूं मला आपली आठवण काय देणार ? '

" मी शिकलेली मुलगी थोडीच आहें ! पोळ्या करतां आल्या तरी कविता कांहीं करतां येत नाहींत मला. माझ्यासारख्या अशिक्षित मुलीची तुला आठवण तरी कशाला हवी ? "

" वा ! म्हणजे आमची कविता फुकटच पाडणार वाटतें ? "

" तुझें नांव घालून मीं एक हातरुमाल कधींच विणून ठेवला आहे हं ! "

" बायका यशस्वी सेनापती झाल्या नाहींत तरी चांगल्या मुत्सद्दी होतील खास ! "

* * * *

पुण्यांत आल्याबरोबर मुरलीधराची स्थिति विहिरींतून समुद्रांत आलेल्या माशा-प्रमाणें झाली. तो दिपून गेला नसला तरी बावरला होता. नवा उत्साह, नवी स्फूर्ति, नवें चैतन्य त्याच्या रोमरोमांत संचारलें. पहिल्याच दिवशीं वर्गांत त्याची एका विलक्षण व्यक्तीशीं ओळख झाली. हे गृहस्थ स्वतःला विद्यार्थी म्हणवीत असले तरी त्यांच्या ओंठावरील मिशा व डोक्यावर मधून मधून डोकावणारे पांढरे केस त्यांचा त्या पदवीवरील हक्क नाशाबीत करीत असत. त्यांच्या मांडीला मांडी लावून बसणारे विद्यार्थी गुरुजी म्हणून वर्गांतील खुर्चीवर येऊन बसूं लागले होते तरी यांचें तिथलें सिंहासन कायमच होतें. सरस्वतीचा व त्यांचा छत्तीसाचा आंकडा होता म्हणावें तर एक प्रतिभासंपन्न कवि व कुशल कादंबरीकार म्हणून वाङ्मयमंदिरांत त्यांच्यावर स्तुतिसुमनें वाहिलीं जात होतीं. पण पुस्तकें लिहिणाऱ्या या कवीला पुस्तकी परीक्षें-तून मात्र पार पडतां येत नव्हतें. वर्षेच्या वर्षे परीक्षेनें लाथाडलें तरी तिचे पाय धरण्याचें त्यांना वेडच लागलें होतें. उद्यां तुमच्या कादंबऱ्या परीक्षेला नेमल्या गेल्या तरी तुम्ही त्या परीक्षेला बसतच राहणार, अशी त्यांचे मित्र त्यांची थट्टाहि करीत. पण त्यांचें परीक्षाप्रेम आंधळें असल्यामुळें या थट्टेचा कांहींच उपयोग होत नसे.

या स्वारीची व मुरलीधराची गांठ पडली. हळुहळू काव्यशास्त्रविनोदाला भरती येऊं लागली. मुरलीधरानें आपल्या कविता त्यांना भीतभीतच दाखविल्या पण त्यांनीं मुक्तकंठानें त्यांची प्रशंसा केली व आपल्या ओळखीच्या ‘ प्रमदा ’ आणि ‘ प्रताप ’ या मवाळ व जहाल पक्षांच्या प्रमुख मासिकांतून त्या प्रसिद्ध करण्याचें अभिवचनहि दिलें. कविता कोणत्या नांवाखालीं प्रसिद्ध करायच्या हा मुरलीधराला प्रश्न पडला. मुग्ध मनांना नेहमीं लपंडाव आवडतो. इतरांना विस्मयचकित करण्याची बुद्धिहि टोपणनांवाच्या मुळाशीं असते. मुरलीधरानें यापैकीं कोणत्या हेतूनें असेल तें असो ‘ व्रजविहारी ’ या टोपणनांवानें आपल्या कविता ‘ प्रमदा ’ व ‘ प्रताप ’ यांच्याकडे पाठविल्या.

स्वतःची पहिली कविता छापून आलेली मुरलीधरानें पाहिली तेव्हांचा त्याचा आनंद काय वर्णन करावा? पहिल्या अपत्यानें अल्लड मातेची जी स्थिति होते तीच त्याची झाली. कवितांचें प्रकाशन, कादंबरीकारांचा सहवास व काव्यदेवतेची कृपादृष्टि यामुळें त्याला जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणी काव्यच दिसूं लागलें. आकाशांत भराऱ्या

मारणाऱ्या कल्पनेचें, जमिनीवर नागमोडी गतीनें सरपटणाऱ्या व्यवहाराशीं कसें जमावें ? मुरलीधराचेंहि तसेंच झालें. उत्तेजक पेयाची उणीव पाण्याला कांहीं भरून काढतां येत नाहीं. मुरलीधराचें गणिताकडे लक्ष लागेनासें झालें. भूमितींतील आकृति काव्यसुंदरीच्या तुलनेनें त्याला हिडिंबेसारख्या दिसत ! काव्यांतला रस बीजगणिताच्या नियमावलींत त्याला कुठेंच आढळेना. विरक्त मनुष्य जसा संसाराविषयीं उदासीन होतो तसा काव्यानुरक्त मुरलीधर अभ्यासाविषयीं झाला. अभ्यास करावा हें त्याला कळे, पण मुळींच वळेना. त्याचे डोळे वर्गांतल्या पुस्तकावर असतांना त्याचें डोकें निराळ्याच कल्पनांनीं भरून जाई. काव्याची समाधि लागली होती म्हणा वा काव्याची कावीळ झाली होती म्हणा, त्याला काव्याशिवाय कांहीं सुचेनासें व रुचेनासें झालें.

वेणूच्या लग्नाची आमंत्रणपत्रिका याच वेळीं त्याच्या हातांत पडली. सहामाही जवळ आल्यामुळें त्याला लग्नाला जाणें शक्यच नव्हतें. लग्नाचा आहेर म्हणून त्यानें एक अभीष्टचिंतनपर कविता पाठविली व तो सहामाहीच्या अभ्यासाचा प्रयत्न करूं लागला. पण तो प्रयत्न सफळ कसा व्हावा ? काव्य, प्रेम व मद्य या तिन्हींचीहि पकड जबरदस्त असते. मंत्रमुग्ध मनुष्याच्या स्थितीची यथार्थ कल्पना जशी इतरांना येत नाहीं, तशीच काव्यमुग्ध मनुष्याचीहि येत नाहीं. सहामाहीच्या निकालांत मुरलीधर तिसऱ्या वर्गांत आलेला पाहून अनेकांना अचंबा वाटला. कित्येकांनीं तर परीक्षक पेपर तपासतांना चुकले असतील असा तर्कहि लढविला.

निकाल पाहून मुरलीधर घरीं परत आला. काव्याला सोडचिठ्ठी देण्याचा त्यानें मनाशीं निश्चय केला होता. पण काव्य म्हणजे अंगातलं कुडतें थोडेंच होतें कीं, तें चटकन् काढून फेंकून देतां येईल ? तो बिऱ्हाडीं येऊन पाहतो तों मामांचें पत्र आलें असून त्यांत वेणूताईचा पति वारल्यामुळें तिला पुण्याच्या एका शाळेंत ठेवण्याकरितां आपण येत असल्याचा व स्टेशनावर येऊन भेटण्यासंबंधींचा मजकूर होता. मुरलीधराचें मस्तक एकदम सुन्न झालें. आपली वेणूताई विध–त्याला तो शब्द कल्पनेंत देखील सहन होईना. त्यानें वेणूची मनोमय मूर्ति डोळ्यांपुढें उभी केली. ती मूर्ति हंसरी होती व तिच्या कपाळीं सुंदर तिलक दिसत होता. पांढऱ्या फटफटीत कपाळाची वेणू डोळ्यापुढें उभी करतांच त्याच्या अंगावर शहारे उभे राहिले. आपण स्वप्नांत तर नाहीं ना असें त्याला क्षणभर वाटलें. पण काळाचा चिमुकला प्रतिनिधि जवळच उभा राहून ‘ टकटक ’ ‘ टकटक ’ असा आवाज काढीत आपल्या श्रेष्ठत्वाची द्वाही फिरवीत होता. मुरलीधरानें पाहिलें तों स्टेशनवर जाण्याची वेळ झाली होती.

डब्यांतून वेणू उतरत असतांना मुरलीधरानें तिच्याकडे पाहिलें. दोघांची दृष्टादृष्ट होतांच तिनें आपलें तोंड एकदम फिरविलें. मुरलीधराचें हृदय पिळवटून गेलें. या चवदापंधरा वर्षांच्या मुलीला आपलें तोंड दाखवायची चोरी व्हावी ना? घोगऱ्या आवाजानें मुरलीधर म्हणाला, 'इकडून चल ताई.' आतां त्यालाहि तिच्याकडे पाहवेना. तो हातरुमालानें डोळे पुसूं लागला. तो हातरुमाल वेणूनेंच त्याला दिला होता. त्याच्या स्पर्शाबरोबर पंचवटींत दीर्घ कालानंतर परत गेलेल्या रामासारखी त्याची स्थिति झाली. "माझ्यावर निरपेक्ष प्रेम करणारी तीच ही वेणू! आज तिला माझ्याकडे वर मान करून पाहण्याची चोरी झाली आहे. माझ्याशीं धीटपणानें बोलणारी तीच ही मुग्ध कुमारिका! अरेरे! डोळे असून पहायचें नाहीं, कान असून ऐकायचें नाहीं, तोंड असून बोलायचें नाहीं, हृदय असून प्रेम करायचें नाहीं! केवढी ही भयंकर शिक्षा! माझ्यासारख्या महत्त्वाकांक्षी तरुणाला काव्याची मोहिनी दूर सारून अभ्यासजड होतां आलें नाहीं, मग काव्यरसाचें आगर असलेलें स्त्रीहृदय वैराग्याच्या ग्रीष्मांत कसें आनंदी राहील? तें कांहीं नाहीं. वेणूताईला सुखी करण्यासाठीं मला जें कांहीं करतां येईल तें मी अवश्य करीन. तिचें जीवित सुखाच्या मार्गाला लागेपर्यंत मीहि त्या मार्गाला लागणार नाहीं." निमिषार्धांत मुरलीधराच्या मनांत हे विचार येऊन गेले. त्यानें वेणूकडे पाहिलें तों तिच्या डोळ्यांतून अश्रूधारा वहात होत्या. मुरलीधराच्या प्रतिज्ञेला या अश्रुसिंचनामुळेंच कीं काय तत्काळ अंकुर फुटला.

* * * *

वैधव्याइतका करुणरस निर्माण करूं शकणारा कवि जगांत दुसरा कोणीच नाहीं. कुंकुमतिलकाबरोबर सर्व आशा पुसण्याची भयंकर शक्ति त्याच्यांत आहे. वैधव्य हें अग्नि व हालाहल यांच्यापेक्षांहि दाहक असतें. अग्नि देहाची राखरांगोळी करतो; वैधव्य मनाला जाळूनपोळून त्याची राख शरीराला फांसतें. हालाहलाचा दाह रामनामानें शांत झाला, पण वैधव्याचा दाह रामाबरोबर इतर देवांचा धांवा करूनहि शांत होत नाहीं.

मुरलीधराच्या कल्पनेची करुण व कोमल तार या प्रसंगानें-वेणूच्या मुक्या भेटीनें—हलली व ती एका सुंदर काव्याचे सूर छेडूं लागली. काव्य न करण्याचा त्याचा निश्चय वेणूच्या वैधव्याग्नींत वितळून गेला. मधून मधून परीक्षादेवी महिषासुरमर्दिनीप्रमाणें त्याच्यापुढें उभी राही. क्षणभर तोहि काव्याची गुणगुण सोडून घोकंपट्टीकडे वळे, पण त्याचें हृदय इतकें हलून व दुभंगून गेलें होतें कीं, त्या भूकंपांत

अभ्यासाचें सुंदर शहर जवळ जवळ गडपच झालें होतें. मंत्रमुग्ध सर्पाला आपल्या डोक्यावरील मणी कुणी हिरावून नेत आहे याची कुठून पर्वा असणार ? काव्य व अभ्यास यांच्या या रस्सीखेंचीच्या सामन्यांत दुबळ्या काव्याचाच हटकून जय होत गेला. त्यामुळें पहिल्या वर्षाच्या परीक्षेंत मुरलीधराच्या पदरांत अपजय पडला. त्याच्या मनाला हा अपजय चांगलाच झोंबला. पुन्हां परीक्षेच्या फंदांत पडायचें तर दुसऱ्या वर्षाच्या चरितार्थाची सोय लावली पाहिजे. तो ' प्रताप ' मासिकाकडे आपलें ' लीलावती ' हें परीक्षेचा मोबदला देऊन लिहिलेलें काव्य घेऊन गेला. संपादकांनीं त्याला वाटाण्याच्या अक्षता लावल्या. ते म्हणाले, " सध्यां स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे,. ही गर्जना करण्यांत लोक गुंग झाले आहेत. या वेळीं तुमच्या लीलावतीला विचारतो कोण ? यापेक्षां परवांच्या प्रांतिक परिषदेवर अगर शिवाजीमहाराजांवर एखादें काव्य रचाल तर तुमचें थोडें फार चीज होईल. निदान तसलीं काव्यें छापायला तरी कांहीं हरकत नाहीं. पण आमच्या राष्ट्रीय बाण्याच्या मासिकांत असलीं विधवांवरलीं व बायकी नांवांचीं काव्यें छापणें फारसें बरें नाहीं. राष्ट्र सध्यां लढाईच्या गोष्टी बोलत आहे ! त्याला या गंगाभागीरथीच्या गंगायमुना नकोत."

गंगाभागीरथीच्या गंगायमुना हा शब्द-प्रयोग मुरलीधराच्या कानांत तापलेल्या तेलाप्रमाणें शिरला. ' प्रमदे'च्या संपादकांनीं विषयाचें, कवीचें व काव्याचें अभिनंदन केलें. ' तुमच्यासारख्या कवींनीच सामाजिक सुधारणेचा झेंडा घेऊन पुढें सरसावलें पाहिजे ' ते म्हणाले. पण पैशाचा प्रश्न निघतांच त्यांनीं नन्नाचा पाढा वाचावयाला सुरवात केली. 'आपल्या समाजांत कविता व बायका पायाखालीं तुडविल्या जात आहेत पुण्याहवाचनाच्या वेळीं पैठणी नेसून नवऱ्याच्या हाताला हात लावणें एवढाच बायकोचा हक्क आणि वेलबुट्टयांच्या मध्यभागीं मोठ्या अक्षरांत एखाद्या पानावर आपला संसार मांडणें एवढेंच कवितेचें काम. फार तर मी तुमचें काव्य प्रत्येक अंकांत थोडें थोडें छापीन. पण पैशाविषयीं म्हणाल तर ओळीला एक पै देखील देतां येणें कठीणच !

शिवीगाळ करणाऱ्या वर्तमानपत्रांना, चटोर कादंबऱ्यांना, बाष्कळ व कुत्सित बातम्या देणारांना भरपूर आश्रय मिळतो आणि कवितेला मात्र नाहीं ! सरस्वती मंदिरांतील कांटेरी झाडाझुडपांना मोल येतें आणि तिच्या कंठांत रुळणाऱ्या पुष्पमाळेला मात्र कुणी विचारीत नाहीं. गंगेचें स्नान सोडून नळाखालीं बसणाऱ्या लोकांना हंसावें कीं रडावें ?

'पुढें काय?' हा प्रश्न मुरलीधरापुढें दत्त म्हणून उभा राहिला. परीक्षेंत नापास झाल्यामुळें आप्त इष्ट उनाड म्हणून बोंचून खाणार. पुन्हां अभ्यास करावा तर महिन्याच्या शेवटीं खाणावळवाला कवितेचे कागद नोटांदाखल थोडेच घेणार आहे? इतकेंहि करून अभ्यासाला लागलें तर या कवितेच्या जाळ्यांतून कसें सुटावें? परीक्षा पास होऊन तरी आपल्याला सुख कसें होणार? आपल्याला पदकें मिळालीं म्हणून वेणूच्या सौभाग्यतिलकाची उणीव त्यांनीं थोडीच भरून निघणार आहे!

अशा उद्विग्न मनःस्थितींत नागपुरच्या शाळेची एक जाहिरात त्याच्या दृष्टीस पडली. शाळेला संस्कृत शिकवायला मनुष्य पाहिजे होता. कानावलेल्या मुरलीधरानें तत्काळ अर्ज केला. त्याला ती जागा मिळालीहि. जातांना एक वेळ वेणूला भेटून जावें असें त्याच्या मनांत आलें. पण ज्या संस्थेंत तिला ठेवली होती, तिथें पालकांच्या परवानगीवाचून कोणाहि मुलीला बाहेरील मनुष्याला भेटूं देत नसत. मामांना वेणूताईला भेटायला परवानगी द्या म्हणून कोणत्या तोंडानें पत्र लिहायचें? शिवाय भेटायचें म्हणजे तरी काय करायचें? स्टेशनवरील देखावा पुन्हां त्याच्या डोळ्यांसमोर नाचूं लागला. वेणूच्या पांढऱ्या फटफटीत कपाळाकडे आपणाला पाहण्याचा धीर होईल काय? या वेळीं आपण जाऊन भेटणें म्हणजे तिच्या मनाच्या जखमेवरील खपली नखानें काढणें आणि पुण्यांत राहणें म्हणजे आपल्या जखमेंत आपल्याच हातानें मिठाचें पाणी ओतणें होय असें त्याला वाटलें. तो नागपूरला निघून गेला.

* * * *

काळाची आगगाडी कोणत्याहि प्रसंगाच्या स्टेशनवर अधिक थांबत नाहीं. नागपूरला कविता हाच मनाला विरंगुळा झाल्यामुळें व वैधव्यवन्हींत होरपळणाऱ्या वेणूची मूर्ति रात्रंदिवस डोळ्यांपुढें नाचत असल्यामुळें मुरलीधराच्या लेखणींतून एकापेक्षां एक करुण व सरस अशीं काव्यें बाहेर पडूं लागलीं. नागपूरला आल्या-नंतर आपल्या पुढील कविता 'व्रजविहारी' या नांवाखालीं न छापतां निनांवी छापण्याविषयीं त्यानें 'प्रमदा' मासिकाला लिहिलें. त्याचप्रमाणें कवीविषयीं कुणीं चौकशी केल्यास एक कल्पित नांव व गांव सांगण्याविषयींहि त्यानें संपादकांना लिहिलें होतें. 'वाचकांना कवीचें नांव कळवून तरी काय करायचें आहे? नवरसांनीं ब्रह्मानंदांत बुडविणाऱ्या कवीला घासभर अन्न खावयाला मिळतें कीं

नाहीं याची हे थोडीच चौकशी करणार आहेत ?' अशी निनांवी कविता छापतांना त्याची विचारसरणी होती. मधून मधून वेणूला पत्र पाठविण्याचा विचार त्याच्या मनांत येई. पण पत्र तिच्या अध्यापकांच्या हातांत जाणार ही गोष्ट उघड होती. इतक्या उप्पर पत्रांत लिहायचें काय, हा प्रश्न त्याच्यापुढें दत्त म्हणून उभा राही. त्यानें हजारों वेळीं पत्र लिहायला घेतलें असेल पण लीलेनें काव्यें रचणाऱ्या त्याच्या लेखणीला एकहि पत्र संपवितां आलें नाहीं.

इकडे वेणू भराभर एक एक यत्ता मागें टाकीत चालली होती. ती मॅट्रिकच्या वर्गांत असतांना 'प्रमदे 'मध्यें 'लीलावती' हें खंडकाव्य प्रसिद्ध होऊं लागलें. त्या काव्यानें तिला जितकें रडविलें तितकेंच उत्साहपूर्ण केलें. त्याच्या पूर्वार्धांत बालविधवेचें करुणाजनक चित्र रेखाटलें असून उत्तरार्धांत ती प्रयत्नानें विदुषी होऊन आपल्या अनाथ भगिनींची स्थिति सुधारते असें दाखविलें होतें. मॅट्रिकच्या पुढें शिकून काय करायचें, आपलें पोट आपण अब्रूनें कुठेंहि भरूं असे विचार क्वचित् वेणूच्या मनांत येत असत. पण 'लीलावती' काव्यानें तिच्यापुढें एक निराळाच आदर्श ठेवला व असल्या उदास विचारांचें तिच्या महत्त्वाकांक्षी मनांतून उच्चाटन केलें. "खरेंच, या कवीचें मन किती उदात्त व हृदय किती कोमल असलें पाहिजे बरें ! समाजसेवेमध्यें जर अशा असामान्य मनुष्याचें साहाय्य मला मिळेल—" हा विचार मनांत येतांच ती किंचित् कंपित झाली. साहाय्य मिळायचें कसें ? मित्र म्हणून कीं पति म्हणून ? दुसरी कल्पना मनांत येतांच, कां कोण जाणे, ती किंचित् ओशाळली. शाळेंतील वादविवाद-मंडळांत पुनर्विवाह करणें हें मुळींच पाप नाहीं, असें ती जोराजोरानें म्हणत असे. पण स्वतःच्या पुनर्विवाहाचा विचार मनांत येतांच तिचें धीट मनहि क्षणमात्र किंचित् बिचकलें.

'लीलावती' काव्याच्या कर्त्याविषयीं तिनें संपादकांकडे चौकशी केली; पण त्या काव्याविषयीं जितका तिला आपलेपणा वाटला तितका कवीच्या नांवागांवाविषयीं वाटेना. तें तिनें पूर्वी कधींच ऐकलें नव्हतें. मधून मधून तिनें मुरलीधराची चौकशी करावी पण तो पुण्यांत असतांना 'व्रजविहारी' या नांवाखालीं कविता लिहीत असे व सध्यां तो पुणें सोडून गेला आहे, यापेक्षां तिला जास्ती कांहींच माहिती मिळाली नाहीं. खुद्द तिच्या वडिलांनाहि त्याचा पत्ता माहीत नव्हता. तो मुंबईच्या एखाद्या कॉलेजांत शिकत असेल म्हणून २–३ वर्षें तिनें युनिव्हर्सिटीचे निकाल उत्कंठेनें पाहिले. पण त्यांत मुरलीधराचें नांव तिला कुठेंच आढळलें नाहीं. त्यानें आठवण

म्हणून स्वतः लिहून दिलेली कविता 'लीलावती'च्या प्रतींत घालून ती मधून मधून वाची व स्वतःशींच म्हणे "मुरलीधर परदेशीं शिकायला गेला असला तरी त्यानें मला बोटभर चिठ्ठीदेखील कां बरें पाठवूं नये? लागला असेल तिकडल्या एखाद्या इंग्रज मुलीचा लळा. पुरुषांचें प्रेम समुद्रासारखें; दिवसांतून दोन वेळां त्याला भरती ओहटी यायची हेंच खरें!"

मुरलीधराला नागपुराला येऊन आठ वर्षें झालीं होतीं. यंदांच्या बी. ए. च्या निकालांत वेणूचं नांव असणार ही त्याची खात्री होती. समोर पडलेला वेणूचा हातरुमाल पाहून त्याला आपल्या मॅट्रिकच्या निकालाच्या दिवसाची आठवण झाली. त्या वेळीं आपली शिष्यीण असणारी वेणू आज बी. ए. होणार आणि आपण—! मुरलीधर खिन्नपणानें हंसला. बी. ए. च्या निकालांत तिचें नांव पहिल्या वर्गांत आलेलें त्यानें पाहिलें. लवकरच नागपुरला होणाऱ्या विद्यार्थिनींच्या संमेलनाच्या अध्यक्षस्थानीं तिची योजना झाली असल्याचें वृत्तहि त्याला कळलें.

* * * *

संमेलनाच्या अध्यक्षीणबाईंचा फोटो व भाषण संमेलनाच्या दुसऱ्याच दिवशीं वर्तमानपत्रांत आलें. कंपित हृदयानें मुरलीधरानें त्या फोटोकडे पाहिलें. कपाळावर कुंकुमतिलक नव्हता. पण त्याची उणीव विद्वत्तेच्या तेजानें भरून काढली होती. वेणूचें भाषण तर मुरलीधराला फार आवडलें. त्यांत अतिशय गोड भाषेनें स्त्रियांची वकिली केली होती. अवघ्या ८--९ वर्षांपूर्वी सामान्य भासणाऱ्या मुलीच्या डोक्यांतून हे सुंदर विचार प्रगट झाले होते.

तें भाषण वाचून वेणूला भेटावें अशी उत्कट इच्छा मुरलीधराच्या मनांत उत्पन्न झाली. आजचा प्रसंग नऊ वर्षांपूर्वीसारखाच होता. इतक्या दिवसांनीं तीं दोघें बोलणार होतीं. पण या नऊ वर्षांत केवढें मोठें परिवर्तन घडून आलें होतें. त्या वेळच्या वेणूची भूमिका आजच्या मुरलीधराकडे होती व मुरलीधराचें काम वेणूकडे गेलें होतें. त्या वेळीं मुरलीधर विद्वान् होता. आज ती त्याच्यापेक्षां अधिक सुशिक्षित झाली होती. त्या वेळीं मुरलीधर मोठा मनुष्य होणार म्हणून वेणू त्याच्याकडे आदरानें पहात होती. आज वेणू त्याच्याच नव्हे तर सर्व सुशिक्षित वर्गाच्या आदराला पात्र झाली होती.

वेणूच्या भेटीचें अग्निदिव्य करायचेंच असें त्यानें ठरविलें. 'या अग्निदिव्यांत आपली आशा जळून खाक तरी होईल अगर सीतेसारखी अधिक उज्ज्वल होऊन येईल' असें त्यानें आपल्या मनाचें समाधान केलें.

तो वेणूच्या बिऱ्हाडीं गेला तेव्हां आपल्या खोलींत ती एकटीच बसली आहे असें त्याला कळलें. त्यानें आपल्या नांवाची चिठ्ठी पाठविली. ‘ आंत घेऊन या ’ असा निरोप सांगण्याऐवजीं वेणूच बाहेर धांवत आली. तिनें क्षणमात्र मुरलीधराकडे पाहिलें. चौदा वर्षांनीं रामाला पाहणाऱ्या भरताप्रमाणें ती गाहिंवरून जाऊन सद्गदित कंठानें म्हणाली, “ आंत या. ”

मुरलीधर तिच्या मागोमाग खोलींत गेला. टेबलावर पहातो तों ‘ लीलावती ’ काव्य पडलें होतें.

“ आपल्या वाचनांत मी व्यत्यय आणला वाटतें ? ”

“ आठ—नऊ वर्षांनीं गांठ पडत असली तरी मी पूर्वीचीच वेणू आहें बरें. ”

“ मूर्ति तीच असेल पण कीर्ति मोठी झाली आहे ना ? संमेलनाच्या अध्यक्षीण-बाईंना यःकश्चित् शाळामास्तरानें एकेरी हांका मारणें बरें दिसेल कां ? ”

“ इथें कांहीं संमेलन नाहीं. आपल्या राणीसाहेबांना बरोबर घेऊन आलां असतां तर मात्र झालें असतें खरें ! ”

“ वेणूताई, माझ्या गृहराज्यांत राजा मीच, राणीहि मींच व प्रजाहि मीच आहें. ”

“ म्हणजे ? ”

“ माझे दोन हाताचे अद्याप चार हात झाले नाहींत ! ”

“ या बाबतींत पुरुषांचा कांहीं कुणी हात धरलेला नसतो. ”

“ धर्मानें धरलेला नसेल; पण हृदयानें असला तर ? भरताला सिंहासनावर बसायला कुणी हरकत केली होती ? पण—”

“ कोणत्या रामासाठीं—नाहीं रामेसाठीं ही तपश्चर्या केलीत तें तरी कळूं या. ”

“ तपश्चर्या कसली आहे त्यांत ? आपल्या देशांत बालविधवा थोड्या कां आहेत? ”

वेणू स्तब्ध राहिली. मुरलीधराच्या प्रश्नांत त्याचें हृदयच उतरलें आहे असें तिला क्षणभर वाटलें. विषय बदलण्याच्या हेतूनें मुरलीधर म्हणाला, “ ‘लीलावती’ काव्य वाचीत होतां वाटतें ? ”

“ माझें फार आवडतें आहे तें. विद्यमान कवींत तरी इतका प्रतिभासंपन्न—”

“ वरच्या दर्जाचा कवि आहे, पण त्याच्यांत दोष आहेतच. ” मुरलीधर चांचरत म्हणाला.

“ तुम्ही पुरुष दोष पाहतां, आम्ही बायका फक्त गुण पाहतों ” असें म्हणून वेणूनें तें पुस्तक उचललें. त्या पुस्तकांतून एक पत्र बाहेर डोकावत होतें. “ खरंच

या पत्राचें उत्तर काय द्यावें याच विवंचनेंत मी होतें मुरलीधर. या बाबतींत तुमच्यासारख्या जवळच्या नातलगाचा मला सल्ला पाहिजे ? ”

“ कसलं पत्र आहे तें ? ”

“ इथल्या एका बॅरिस्टरांनीं माझ्याशीं पुनर्विवाह करण्याची इच्छा प्रदर्शित केली असून मला मागणी घातली आहे ”

मुरलीधराचा चेहरा गोरामोरा झाला होता. त्यानें खोल आवाजानें विचारलें, “ काय म्हणतात ते ? ”

“ म्हणणें नेहमींचेंच. संसाररथाचीं दोन्हीं चक्रें समान पाहिजेत. म्हणून मी सुशिक्षित वधू पाहातों आहें. माझ्या मागणीला होकार देऊन आपण मला कृतार्थ कराल अशी आशा आहे, इत्यादि. ”

मुरलीधर आवेगानें जिवाचा धडा करून म्हणाला, ‘ वेणूताई, तें पत्र माझ्याकडून आलें असतें तर तूं काय उत्तर दिलें असतेंस ? ”

एवढे शद्ब कसेबसे उच्चारून तो दुसरीकडे पाहूं लागला. वेणूचें हृदय व त्याच्याबरोबर तिच्या हातांतील पत्रहि कंपित झालें. ती दाटून आलेल्या कंठानें म्हणाली, “ या प्रश्नाचें मी कसें उत्तर देऊं ? ”

मुरलीधर म्हणाला, “ प्रेमाच्या राज्यांत जुलुमाला जागाच नसते. ”

आपल्या लुगड्याचा पदर बोटाभोंवती गुंडाळीत वेणू निग्रहानें म्हणाली, “शिक-लेल्या मुलाला आपली अर्धांगी 'सुशिक्षित असावी असें वाटतें, तसें शिकलेल्या मुलीला आपला पति सुशिक्षित असावा असें वाटणारच कीं नाहीं ? मुलांसारखींच मुलींचींहि मनें असतात. मी बी. ए. झालें आहे, तेव्हां पुनर्विवाह करायचाच असेल तर तो माझ्यापेक्षां अधिक शिकलेल्या मनुष्याबरोबरच करावा असें माझ्या मनाला वाटणें स्वाभाविक नाहीं कां ? तुमच्यासारख्या कमी शिकलेल्या मनुष्याशीं मीं लग्न केलें तर सुशिक्षित स्त्रियांचा दर्जा मी कमी केल्यासारखा नाहीं कां होणार ?”

भरून आलेल्या कंठानें मुरलीधर उत्तरला, “ असें असेल तर या बॅरिस्टरांच्या मागणीला होकार दे. प्रेमाचें अस्तित्व काव्याबाहेर असूं नये अशीच देवाची इच्छा असेल. ”

“ देवाची कां ? मनुष्याचीच म्हणानात. मुलीकडे पाहतांना रूप, विद्या व हुंडा यांपलीकडे जर पुरुष जात नाहींत तर जिला आपला पति निवडण्याची संधि आली आहे ती मुलगी तरी रूप, विद्या व ऐश्वर्य यांच्यांपलीकडे कशाला पाहील ? ”

" खरें आहे, जसें द्यावें तसें घ्यावें." मुरलीधर खिन्नपणानें म्हणाला.

" मी मात्र या बॅरिस्टरांना नकारच देणार."

" कां ?"

" पुरुषांना धडा घालून देण्याकरितां."

" कोणता धडा ?"

" हृदयालाच हृदयाचें मोल करतां येतें. माझी निवड तुम्हांला सांगितली तर तुम्हीं आपल्या या वेड्या वेणूताईवर रागावणार नाहीं ना ?"

मुरलीधराचें मन संशयाच्या वावटळीवर भिराभिरूं लागलें. तो रुद्ध कंठानें म्हणाला, " नाहीं."

वेणूनें हातांतील ' लीलावती ' पुस्तक पुढें धरलें व ती म्हणाली, " व्यवहारांत माता मुलीचें लग्न जुळवून आणते पण इथं मुलगीच आईचं लग्न ठरवून चुकली आहे. ही ' लीलावती, माझी मुलगी." आनंद व विस्मय यांनीं मुरलीधर क्षणभर भान विसरला. पण लगेच तो म्हणाला, " जुन्या काळीं धनुष्य व मत्स्य यांची भेद्रेश्वरी चाले. नव्या काळीं पुस्तकें तें काम आपल्याकडे घेणार असें वाटतें ! पण या कवीची तुला कांहीं माहिती आहे का ?"

" मी त्यांच्याविषयीं ' प्रमदा ' कचेरींत चौकशी केली होती; पण त्यांचें नांव-गांव मला अगदीं अपरिचित वाटलें."

" तो एखादा तिस्मारखान असला तर ?"

" इतकें करुण, कोमल काव्य लिहिणारा मनुष्य कठोर असणें शक्यच नाहीं. काव्य हें मनुष्याच्या हृदयाचें सार असतें. या लीलावतीनेंच माझा भयाण भाविकाल उज्ज्वल केला. म्हणूनच इतकें उदात्त चित्र रेखाटणाऱ्या हृदयाचा सहवास मला लाभावा, असा हव्यास मी धरीत आहें."

" प्रेम आंधळें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. इतकें चांगलें काव्य लिहिणारा कवि कदाचित् मनानें मोठा असेल. पण अठरा विश्वे दारिद्र्य त्याच्या घरीं असलें तर–"

" त्या दारिद्र्याच्या आगींत त्यांची काव्यलता जळून जाऊं नये म्हणूनच तर मला त्यांची सहचारिणी व्हायचें आहे. काव्यरचनेला पाहिजे तशी मनाची प्रसन्नता व जीवनाची शांतता मी त्यांना देऊं शकेन. बॅरिस्टरीण म्हणून मिरवण्यापेक्षां कवि असलेल्या पतीला साहाय्य करून उदात्त काव्यें जगाला देवविणें अधिक श्रेयस्कर नाहीं का ?"

" हें सगळें मनोराज्य ' लीलावती 'चा कर्ता तरुण व अविवाहित आहे असें गृहीत धरूनच चाललें आहे. तो वृद्ध असला तर—"

"—तर ' लीलावती' प्रमाणेंच मला आपली कन्या माना म्हणून मी त्यांची विनवणी करीन."

" आणि तरुण असून विवाहित असेल तर ?"

" त्यांच्या गुणाचें चिंतन करीत त्यांच्या 'लीलावती'च्या पावलावर पाऊल टाकून समाजसेवा करण्याचा प्रयत्न करीन. बिनतारी तारायंत्राचा शोध हल्लीं निघाला म्हणतात, पण खरें पाहतां तो प्रेमाबरोबरच जन्माला आला आहे. ' लीलावती 'चा कर्ता माझ्यापेक्षां कमी शिकलेला असो वा दुपारची भ्रांत असण्याइतका गरीब असो, त्याचें हृदयसौंदर्य मला अमोल वाटतें."

" देव करो आणि ' लीलावती 'चा कर्ता तरुण व अविवाहित असो !"

" पण त्यांचा नक्की पत्ता कसा काढायचा हा ?"

" मी तुला या बाबतींत शक्य तें साहाय्य करीन."

" शक्य तें. अगदीं वकिलाला शोभणारे शब्द आहेत हे."

" एका महिन्यांत त्याचा शोध लावण्याची प्रतिज्ञा करतों, मग तर झालें ? मी पुन्हां येईन तो त्यांनाच तुझ्या भेटीला घेऊन येईन."

* * * *

पुढच्या पंधरवड्यांत ' प्रमदे 'चा नवा अंक वेणूनें नेहमींप्रमाणें उत्कंठेनें फोडला. पहिल्याच पानावर एक छोटी कविता—मुरलीधरानें नऊ वर्षांपूर्वी तिला लिहून दिलेली—तिनें त्याची आठवण म्हणून जपून ठेवलेली कविता ! तिनें खालीं कवीचें नांव पाहिलें. ' लीलावतीचा कर्ता !' तिच्यां अंगांत एकदम वीज सळाळली.

जिन्यावर पावलें वाजलीं. ती मुरलीधराचींच होती. तो कोल्हटकरांच्या सहचारिणींतील पद गुणगुणत येत होता—

**" आधार आदर प्रणया । अति संकट त्याविण तें उभयां ॥**
**आदर प्रणयी परिणत होई । कारण तें तरि हो न भया ॥ "**

१९२८

# गीतारहस्य

"सदानन्द, पाहिलेस का त्या म्हाताऱ्याचे डोळे! तो त्या कोपऱ्यांत रेलून बसलेला बघ! कसे कोल्ह्यासारखे आहेत, नाहीं?"

"आली का तुझी वेडाची लहर? पुरुषांच्या डब्यांत वसला आहेस म्हणून बरं आहे. बायकांच्या डब्यांत नजर चुकवून घुसला असतास तर कुणाकडे बघूं नि कुणाकडे नको असें होऊन गेलें असतें तुला यशवंत. मनुष्यांत एखाद्या गुणाबरोबर विक्षिप्तपणा असलाच पाहिजे, असें आहे का रे?"

"स्तुतीनें भाळून जाऊन या सिद्धान्ताला मान्यता देण्याइतका मी खुळा नाहीं हं."

"खुळ्याला काय शिंगें असतात आणखी? तुझ्या आवडीचे डोळे असलेली मुलगी तुला मिळायच्या आधींच आमचे डोळे मिटणार असें वाटूं लागलें आहे."

"तूं वाटेल तेवढी थट्टा केलीस तरी माणसाला जसें मित्रांवरून तसें डोळ्यांवरूनहि ओळखतां येतें. हृदयाचें छायाचित्र डोळे घेत असतात! मुलाकडे कौतुकानें पाहणाऱ्या आईचे डोळे, पतीची वाट पाहणाऱ्या पत्नीचे डोळे, भाऊबीजेच्या दिवशीं भावाला ओंवाळणाऱ्या बहिणीचे डोळे—"

"या सर्व डोळ्यांपेक्षां तुझे कानच प्रेक्षणीय होणार! कुठलें डोक्यांत वेड घेतलें आहेस?"

"ज्याला डोकें असतें त्याच्याच डोक्यांत वेड शिरतें." यशवंत कानावरल्या कठोर कोटीचा सूड उगवण्याकरितां म्हणाला. "तुमच्यासारख्या बिन-डोक्याच्या माणसांना त्याचा अनुभव कुठून येणार?"

धुमसत असलेला अग्नि एकदम पेटावा त्याप्रमाणें या मित्रांच्या जोडींत या उत्तर-प्रत्युत्तरांनीं जोराचा वाद सुरू झाला. दारूप्रमाणें अभिमानाचीहि निशा

मनुष्याला चढत असते. यशवंत व सदानंद या दोघांनाहि आपापलें म्हणणें खरें वाटत होतें. या अभिमानाच्या निशेंत त्यांनीं मोठमोठ्यानें बोलावयाला सुरवात केली. डब्याच्या कोंपऱ्यांतील गृहस्थ अंगावरली गुलाबी शाल सांवरून हा वादविवाद लक्षपूर्वक ऐकूं लागले. त्यांच्या शेजारीं बसलेले व वेषावरून भिक्षुकीपेशाचे दिसणारे गृहस्थहि तंबाखुची चिमूट तोंडांत टाकायचें विसरून या द्वंद्वयुद्धाकडे पाहूं लागले.

" तुम्ही डोक्याचे लोक काय दिग्विजय लावतां आहां तें दिसतेंच आहे साऱ्या जगाला ! परवां बी. ए. झालेली ती मुलगी डोळ्यांत पाणी नाहीं म्हणून नाकारलीस—डोळ्यांत नसलें तरी अंगांत पाणी असल्याशिवाय का बी. ए. झाली ती ? त्या सावकाराच्या मुलींत काय व्यंग होतें ? म्हणे तिचे डोळे प्रेमळच नाहीत. बाप मुलीच्या अंगावर चांगलें दहा शेर सोनें घालणार होता. द्यायचा होता तिला एक चांगला सोनेरी चष्मा घेऊन ! "

" सदानंद, प्रेम आंधळें असतें. त्याला दहा शेर सोनें दिसत नाहीं आणि बी. ए. चें सर्टिफिकीटहि त्याच्या डोळ्यांत भरत नाहीं."

" चांगले डोळे मात्र त्याला दिसतात ! तुझ्यासारख्या सुधारकानें जन्माचा जोडीदार निवडतांना निव्वळ डोळ्यांवर भरंवसा टाकावा ही हास्यास्पद गोष्ट नाहीं का, यशवंत ? "

" किती वेळां तुझ्यापुढें उरस्फोड केली तरी तुझा वितंडवाद कमी होत नाहीं. गवताचा उत्तम कागद करतां येतो; तेव्हां कुळाला नसतें महत्त्व देण्यांत मतलब नाहीं. रूप म्हणजे वरचा मुलामा ! शिक्षणानें मुलगी उत्तम पोपटपंची करील; पण कोकिळेची गोडी त्यांत कुठून येणार ? शेवटीं उरला तुझा हुंडा ! हुंड्याकडे बघून लग्न करायचें म्हणजे वेश्यांप्रमाणें पुरुषांनींहि शरीरविक्रय करायचा, असेंच नाहीं का होत ? बाकी तुला हें पटायचें नाहीं म्हणा. तूं पडलास सारस्वत. हजारांनीं हुंडा घेणें हें तर तुमच्या जातीचें ब्रीद ! "

" जणुं काय तुमच्यांत हुंडा अस्पृश्यच मानीत असतील ! परवांचें स्वतःचें पुण्याचें व्याख्यान लक्षांत आहे ना ! "

यशवंत स्तब्ध राहिला. औषध टोंचणाऱ्या डॉक्टराच्या हातून शरीरांत विष घातलें जावें त्याप्रमाणें तात्त्विक वादविवादाच्या भरांत तो सदानंदाच्या

जातीवर घसरला होता ! बोलतांना आपल्याला सुमार राहिला नाहीं असें त्याला वाटूं लागलें. तो खिडकींतून बाहेर पाहूं लागला.

यशवंत विमनस्कपणें खिडकीबाहेर बघत किती वेळ तरी बसला असता. पण कोंपऱ्यांतल्या गृहस्थांनीं आपला मोर्चा त्याच्याकडे वळविल्यामुळें त्याला खिडकींतून माघार घेणें प्राप्त झालें. आगगाडींत बसणें म्हणजे साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत शिरण्यासारखें असतें. नांवागांवापासूनच तों थेट पगारपोरांपर्यंत वाटेल तो मनुष्य वाटेल ती चौकशी करीत असतो; आणि मुका अगर बहिरा नसलेल्या मनुष्याला शिष्टाचार म्हणून कां होईना, त्याच्या प्रश्नांचीं उत्तरें द्यावीं लागतात. यशवंताची स्थितीहि अशीच झाली. एखाद्या गवयाच्या जखमेंतून रक्त वाहत असतांना त्याला गाण्याचा आग्रह व्हावा, त्याप्रमाणें सदानंदाशीं झालेल्या बोलाचालीनंतर एखाद्या अनोळखी मनुष्याच्या प्रश्नांना उत्तरें देत बसणें त्याच्या जीवावर आलें. पण आलेल्या भोगाला सादर होण्याखेरीज त्याला गतीच नव्हती. त्या गृहस्थांनीं पहिला प्रश्न केला—

‘ कांहो, आपणांला कुठें तरी पाहिलें असावें असें वाटतें. ’

**यशवंत**—आगगाडींतच असेल केव्हांतरी !

**गृहस्थ**—छेः हो. आगगाडींतील ओळख अशी विसरायला होते कीं काय ?

**यशवंत**—मग खाणावळींत असेल एखाद्या.

**गृहस्थ**—तें जाऊं द्या म्हणा–आपलें नांव काय ?

**यशवंत**—यशवंत विनायक कोटिभास्कर.

‘ कोटीभास्कर हें नांव कानांवर पडतांच शेत नांगरतांना मोहरांचा हंडा सांपडावा तशी त्या गृहस्थांची स्थिति झाली ! “ आमचेच म्हणायचे तुम्ही ” आपल्या जरीकांठीं रुमालावरून हात फिरवीत ते यशवंताला म्हणाले. त्यांच्या या बोलण्याचा यशवंताला अर्थबोधच झाला नाहीं. हा कोणी वसुधैव कुटुंबकवृत्तीचा साधु आहे कीं ठाण्याच्या इस्पितळांतून पळून आलेला वेडा आहे, या विचारांत तो पडला. तोंडांतली पिंक खिडकीबाहेर टाकून ते गृहस्थ म्हणाले, “ हो, बरी आठवण झाली. मागच्या आठवड्यांत पुण्याला हुंड्यावर ज्यांचें व्याख्यान झालें ते यशवंतराव कोटीभास्कर आपणच वाटतें ? ” यशवंतानें हास्यमुद्रेनें मान हालविली. सभामंदिरांतील श्रोत्यांच्या टाळ्यांपेक्षांहि या अनपेक्षित प्रश्नानें त्याला अधिक गुदगुल्या झाल्या. त्यानें विजयी मुद्रेनें सदानंदाकडे पाहिलें. तो मिस्किलपणानें हंसत होता. “ ज्ञानप्रकाशांत वाचलें तें मी तुमचें व्याख्यान. फारफार आवडलें बोवा

आपल्याला. होय कीं नाहीं; शास्त्रीबुवा ? " शास्त्रीबोवांनीं मान हालविल्यासारखें वाटलें. पण तें मान हलविणें संमतिदर्शक होतें वा वार्धक्यदर्शक होतें हें सांगणें मात्र कठीण होतें ! " त्या भाषणाचा अंक जपून ठेवला आहे मी. " असें म्हणून ते गृहस्थ आपल्या सामानाकडे जाऊन एक भलें मोठें पाकीट उघडूं लागले.

" गृहस्थ मोठा रसिक आहे, नाहीं ! " यशवंत सदानंदाकडे वळून म्हणाला.

" याचे डोळे बघ. कुत्रा म्हणून कोल्ह्याला कवटाळूं नकोस. " सदानंद हळूच पुटपुटला. स्तुतिमदिरेनें बेभान झालेल्या यशवंताच्या मनाला सदानंदाचें हें बोलणें आवडलें नाहीं. ' ऊं ' असें म्हणून तो त्या गृहस्थाकडे पाहूं लागला. त्या गृहस्थांनीं पाकिटांतून एक मोठीं पुडी काढली व ती हळुहळू सोडीत ते यशवंता-पाशीं येऊन बसले. " तुमच्या व्याख्यानाच्या अंकांतच सोलापुरी चिवडा बांधून घेतला आहे हा. दोन्ही अप्रतिम ! " चिवड्याची उपमा यशवंताला फारशी पटली नाहीं. तो कांहीं उत्तर देणार इतक्यांत त्यांनीं पुडी पुरती उघडली आणि नाकावरचा चष्मा नीट करून तेल व तिखट यांनीं रंगलेला मजकूर ते वाचूं लागले. " काय अमोलिक वाक्य आहे हें. कोरून ठेवावें अगदीं हृत्—काय म्हणतात तें हृत्पटावर ! " यशवंत औत्सुक्यानें ऐकूं लागला. सदानंद वाळूच्या कणांप्रमाणें दिसणाऱ्या पुड्यांतील तिखटाकडे पहात होता. गृहस्थापाशीं जेवढें अकलेचें तेवढेंच चिवड्यांत पोह्यांचें दुर्भिक्ष आहे हें त्याला स्पष्ट दिसत होतें.

" वाहवा ! काय वाक्यें आहेत हीं ! टिळकांच्यासारखीं जोरदार ! ' हुंडा घेणें म्हणजे आपल्या बायकोच्या बापाचें रक्त पिणें आहे. ह्या हुंड्याच्या पायीं किती मूर्खांनीं रंभा झिडकारून शूर्पणखा कवटाळल्या असतील, अमृतकलश लाथाडून मदिरापात्र ओंठाला लावलें असेल, '—"

सदानंदानें मधेंच टाळ्या वाजविल्या. स्तुतीच्या कैफानें गुंग झालेला यशवंत चिडून म्हणाला, " हा फाजीलपणा बस्स कर हं, सदानंद. "

" शास्त्रीबुवा, इकडे या असे. हेच ते परवांचे पुण्याचे वक्ते ! हुंड्याचा किती जोरानें निषेध केला आहे त्यांनीं ! "

इंजिनाच्या अंगाईगीतानें झोंपी जाण्याच्या बेतांत असलेले शास्त्रीबुवा म्हणाले, " प्रतिरामचंद्रच ! त्यांनीं रावण मारला आणि हे हुंडा—"

" चोपून घेणार—" सदानंद हळूच म्हणाला ! पण यशवंतानें तें ऐकिलेंच.

" हुंडा चोपून घ्यायला तुझ्यासारखा सारस्वत लागून गेलों नाहीं. सासरा संस्थानिक असला तरी पै घेणार नाहीं. "

" हुंड्याचें अग्न्यस्त्र फसलें तरी पत्रिकेचें ब्रह्मास्त्र आहेच ना ! " सदानंद थट्टेच्या स्वरानें म्हणाला. पण थट्टा ओळखण्याची सूक्ष्म दृष्टि रागानें आंधळा झालेल्या यशवंताजवळ कोठून असणार ? तो तावातावानें म्हणाला, " तुझ्यादेखत माझी पत्रिका फाडून टाकली आहे, हें सुद्धां विसरलास ना ? पत्रिकेंतल्या अनुकूल ग्रहापेक्षां—"

" डोळे पाहून होणारा अनुकूल ग्रह— " सदानंद मध्येंच म्हणाला. आगींत तेलच पडलें.

यशवंत उसळून म्हणाला ! "हो हो, डोळे पाहून होणारा ग्रह ! पशूंचा स्वभावदेखील डोळ्यांवरून अजमावतां येतो. "

" पशूंचा असेल ! पण बायको म्हणजे कांहीं पशु नाहीं. आतां तुझ्यासारखा भोळा सांब जिचा नवरा होईल ती मात्र पशु ठरणार खास. स्वभावानें तूं पडलास पशुपति ! "

" तुझ्यासारख्या काकदृष्टि मनुष्याशीं बोलण्यांत काय मतलब आहे ? " असें म्हणून यशवंतानें सदानंदाकडे पाठ फिरविली. तों त्या गृहस्थांच्या हातांत चिवडा व आपलें व्याख्यान नसून एक फोटो आहे असें त्याला दिसून आलें.

" पहा पाहूं कसे आहेत ते डोळे " फोटो यशवंताच्या हातांत देऊन गृहस्थ म्हणाले. यशवंतानें त्या डोळ्यांकडे पाहिलें मात्र ! हरपलें श्रेय सांपडल्यासारखी त्याची मुद्रा झाली. त्या फोटोंतील डोळ्यांकडे पाहून आपल्याकडे अवघी एकच शुक्राची चांदणी आहे म्हणून नक्षत्रमंडित आकाश देखील लाजेल अशी कल्पना त्याच्या मनांत चमकून गेली. उषेचें तेज, गंगेचें पावित्र्य आणि संध्येचें वात्सल्य यांचा त्या डोळ्यांत जणुं काय त्रिवेणीसंगमच झाला होता. सदानंद व तो गृहस्थ दोघेहि आनंदानें गोंधळून गेलेल्या त्याच्या चेहऱ्याकडे बारकाईनें पहात होते. यशवंताला डोळ्याच्या खुणेनें कांहीं सुचवावें तर तो अर्धवट पाठमोरा बसला होता. पायाच्या अंगठ्यानें दाबावें तर तो फार दूर होता. त्यामुळें सदानंद कांहीं न करतां स्तब्ध बसला.

" ही आमची भाची माली. मोरोपंतासारख्या आमच्याच कवीच्या भाषेंत सांगायचें म्हणजे ' लग्नाला योग्य जाहली आहे.' "

" आमच्याच म्हणजे ! आपण मोरोपंताचे वंशज आहांत ? "

" छेः छे, मोरोपंत आमचेच म्हणजे कऱ्हाडे." मघाशीं या गृहस्थानें आपल्याला 'आमचेच तुम्ही ' असें कां म्हटलें होतें याचा यशवंताला आतां उलगडा झाला. यशवंत बोलत नाहींसें पाहून ते गृहस्थ पुढें म्हणतात, " शिवाय आम्ही मोरोपंतांचे वंशज नसलों तरी पूर्वज होऊंच कीं नाहीं ? " यशवंत बुचकळ्यांत पडला. गृहस्थांनीं आपली आगगाडी पुढें सुरू केली. " अहो, तुम्हां तरुण माणसांना वक्तृत्व कसें करायचें तें कळलें तरी या व्यवहारांतल्या गोष्टी नाहीं कळायच्या ! उद्यां तुमच्यासारखे वक्ते आणि आमच्या मालीसारखी सुग्रण मुलगी यांचें लग्न झाल्यावर आम्हांला नव्या मोरोपंताचे आजोबा व्हायला कितीसा वेळ लागणार ? " गृहस्थांच्या या दूरदृष्टीचें यशवंतला देखील हंसू आलें. जांवई सर करण्याची हीच संधि आहे असें हेरून गृहस्थांनीं आपला मारा सुरू ठेवला. " आमची माली म्हणजे झांकलें माणिक आहे बरें, यशवंतराव ! सारी सतरा वर्षांची पोरगी, पण शेंकडों पक्वान्नें करण्यांत सुग्रण ! खादीप्रमाणें पक्वान्नांचीं प्रदर्शनें जर कुणीं उघडलीं तर आमच्या मालीलाच पहिलें बक्षीस मिळेल."

" खाणावळ चालविण्याकरितां कांहीं यशवंतरावांना लग्न करायचें नाहीं." सदानंद प्रकरण हाताबाहेर जाऊं लागलें असें वाटून म्हणाला.

मालीच्या डोळ्यांतील पाण्यांत विहार करीत असलेला यशवंत रागानें उद्गारला " चूप बैस तूं. कात्रीसारखें कापीत जाणारें असतें तुझें बोलणें. "

सदानंदाच्या आक्षेपाचें परस्पर निराकरण झालेलें पाहून त्या गृहस्थांना हायसें वाटलें. ते फोटोकडे पाहून म्हणाले, " या फोटोंतल्या डोळ्यांत मुळांतल्या पाण्याचा शंभरावा हिस्सा देखील नाहीं. फोनो मधल्या रहिमतखांच्या गाण्यांत बैठकीची गोडी कुठून हो येणार ? "

यशवंत पुन्हा त्या डोळ्यांकडे पाहूं लागला. त्या निर्जीव चित्रांतील डोळे आपल्याला आकर्षित आहेत असें त्याला वाटलें. 'चुंबकाच्या कक्षेंत आल्यावर लोखंडाला परत फिरतां येत नाहीं.' तो मनांत म्हणाला.

" पाहून जातां तर पहा पोरीला, आणखी दोन स्टेशनें पुढें गेलों कीं आमच्या गांवचें स्टेशन लागतें. बरें होईल उतरून जाल तर."

" उतरून जाल तर म्हणजे काय ? उतरणारच ना ! शुभस्य शीघ्रं असें स्मृतिवाक्यच आहे म्हटलें. कां यशवंतराव विचारांतसे पडलांत ? आमचे मामासाहेब

म्हणजे गांवांतलें बडें प्रस्थ आहे बरें. नदीकांठीं आरामशीर वाडा, नोकरचाकर, जमीनजुमला—अहो, श्रावणांत महारुद्र करतात भैरवेश्वराला !"

" मुलगी पहायला तशी कांहीं हरकत नाहीं." यशवंत चांचरत म्हणाला. " पण—"

" पण काय हुंडा विषासारखा, तेव्हां तो तुम्हीं घेणार नाहींच. तुम्ही आपली पत्रिका फाडून टाकलीच आहे. इच्छा असेल तर आम्हीहि फाडतों मुलीची ! "

" मी आहें सुधारकी मतांचा माणूस."

" नि आम्ही कुठें नाहीं ?" मामासाहेब रुमालावरील जर चापून बसवीत उद्गारले. " हुंडा म्हणजे आग, पत्रिका म्हणजे नुसती साडेसाती, ही तुमचीं सुधारकी मतें आम्हांलाहि मान्यच आहेत. आम्ही टोपी न घालतां रुमाल बांधतों म्हणून सुधारकी नाहीं असें आपल्याला वाटलें कीं काय ?"

" छेः तसें कांहीं नाहीं ! पण जिथें जन्माचा संबंध जडायचा तिथें स्पष्ट बोललेलें बरें ! "

" काय लाखाची गोष्ट बोललांत तुम्ही ! आमची मालीदेखील तुम्हांला शोभेल अशी सुधारकच आहे हं ! कुंकूं इतकें बारीक लावते कीं, पूर्वी आमच्या आईला आठवड्याला लागणारें कुंकू आतां हिला वर्षभर पुरतें. नव्या पद्धतीचा अंबाडा बांधण्यांत तिचा हात एखादी मुंबईची मुलगीहि धरूं शकणार नाहीं." या गोष्टींनीं यशवंताच्या मनावर केंसभरहि परिणाम झाला नाहीं, असें पाहून मामासाहेब अगदीं गुप्त गोष्ट सांगत असल्यासारखा चेहरा करून व स्वर बदलून म्हणाले, " आमच्या घरीं असलेली स्वयंपाकीण सकेशा आहे बरें. पहा, खेड्याच्या मानानें आम्ही किती सुधारणा केली आहे ती."

यशवंतानें मामासाहेबांच्या बरोबर जायचें ठरविलें. सदानंदानें मात्र आपण तुझ्याबरोबर मुळींच येणार नाहीं असें त्याला स्पष्ट बजावलें. मघांच्या रागाच्या आगींतले हे निखारे आहेत असें मानून यशवंतानेंहि त्याला अधिक आग्रह केला नाहीं. आपलें सामान सदानंदाबरोबर देऊन तो मामासाहेब व शास्त्रीबोवा यांच्याबरोबर त्यांच्या स्टेशनावर उतरला. तो उतरत असतांना सदानंद हळूच म्हणाला, " मुलीच्या डोळ्यांवरोबर स्वयंपाकिणीचेहि डोळे बघ हं ! "

* * * *

यशवंत व सदानंद यांचे स्वभाव भिन्न असले तरी मैत्री अभिन्न होती. तांब्यावर फुलपात्र आपटून कर्णकटु आवाज व्हावा त्याप्रमाणें वादविवादाच्या वेळीं राग आणणारे शब्द त्यांच्या तोंडून निघून जात; पण तांब्यांत भांडें घातलें म्हणजे आवाज न होतां तीं दोघेंहि जशीं शोभिवंत दिसूं लागतात त्याप्रमाणें इतर वेळीं त्यांची जोडी नमुनेदार दिसत असे. एकाच शाळेंत बसून एकाच गुरूजीच्या हस्तें त्यांनीं विद्यामृताचें पान केलें होतें. गांवांतल्या नदीच्या घाटावर हितगुज करतांना त्यांचे सुखाश्रु व दुःखाश्रु अनेक वेळां एकत्र झाले होते. यशवंताला ताप आला कीं, सदानंदाच्या तोंडचें पाणी पळे; सदानंद खोकूं लागला कीं, यशवंताच्या छातींत कसेंसेंच होई. त्यांतून यशवंताला आई, बाप, बहीण, भाऊ कोणींच नसल्यामुळें सदानंदाच्या घरींच त्याचे सण साजरे होत. मनाला मन मिळालें कीं जातिभेद किंबहुना स्वभावभेदहि त्यांना तोडूं शकत नाहींत हा अनुभव त्यांना आला होता.

आतांहि तसेंच झालें. काठीचा मार बसतांच पाणी दुभंगावें, त्याप्रमाणें आगगाडींत त्यांचीं मतें झालीं होतीं. पण यशवंत मुलगी पाहून आला त्यावेळीं तें पाणी आपोआप एक होऊन गेलें होतें. यशवंत आला तो सदानंदाच्या घरीं धांवतच गेला. सदानंद त्याचें हुंड्यावरील व्याख्यान आईला वाचून दाखवीत होता. यशवंत दिसतांच सदानंद म्हणाला. " यावें महाराज ! झाली कां डोळ्यांची परीक्षा ? "

" झाली ना ! नि या परीक्षेंत मुलगी उतरली. "

" म्हणजे ? "

" पुढल्या आठवड्यांत मुहूर्त ठरवून आलों कीं ! "

" वाः पठ्ठे ! तुझे गुडघे तरी बघूं या ! "

यशवंताला सदानंदाच्या या बोलण्याचा रोंख कळेना. त्याची बावरलेली मुद्रा पाहून सदानंद खो खो हंसत म्हणाला, " शिवाजी महाराजाप्रमाणें तुला गुडघी रोग झाला आहे कीं काय, हें मला पहायचें नाहीं, फक्त तिथें बाशिंग आहे कीं काय एवढेंच बघतों. "

" कर तूं खुशाल थट्टा ! लग्न करणें म्हणजे थट्टेला आमंत्रण देणेंच आहे. "

" पण गृहस्था, इतका चिक्कू नि स्वार्थी मामेसासरा निवडण्यांत कसला रे शहाणपणा दाखविलास ? "

" माझ्याबरोबर मुलगी बघायला येऊन असें म्हटलें असतेंस तर एक वेळ शोभलें असतें ! का आपली जीभ देवानें दिली आहे म्हणून बोलतोस ? "

" जिभेबरोबर डोळेही देवानें दिले आहेत म्हणून—"

" खरेंच, किती प्रेमळ डोळे दिसतात तिचे ! "

" दिसतातच ना ! कागदांचीं फुलें काय वाईट दिसतात ? "

" मी गेलों त्याच रात्रीं त्यांच्या घरांतील कुत्र्याच्या पिलाला कांहीं होऊं लागलें. सारी रात्र जागत बसून ती त्याची शुश्रूषा करीत होती. "

" आणखी कांहीं वहिनींचे गुण ? "

" हंसतमुख, हुशार, चलाख. "

" कारिकाच म्हणूं लागलास कीं ! "

" परःदुखाप्रमाणें परसुखदेखील– ? "

" शीतळ मुळींच नाहीं. माझ्या अंगाची कशी आग होते आहे. "

" वाड्याजवळ छान नदी आहे. तिच्यांत लग्नाआधीं तुला स्नान घालूं या. म्हणजे तुझी आग शांत होईल. "

" यशवंत, तूं कांहीं म्हण. तुझ्या भोळेपणामुळें तूं फशीं पडणार. अरे त्या मामाचे डोळे पाहिले नाहींस तूं ! "

" मला मामाशीं थोडेंच लग्न लावायचेंय ? "

" पण भाची मामाच्याच तालमींत वाढलेली असणार ! "

" छट् ! कुठे सशासारखे दिसणारे तिचे निष्पाप, प्रेमळ डोळे नि कुठें—"

" आलास मुळपदावर ! तूं पडलास कट्टा सुधारक. वहिनी असणार खेड्यांत वाढलेल्या. दोघांचें जुळायचें कसे ? "

" स्त्री शिक्षणाची सुधारणा, प्रत्यक्ष अमलांत आणल्याचें श्रेय मिळेल. "

" कावीळ झाली कीं, सगळें पिवळें दिसतें; तुझें नि वहिनीचें कसें जुळेल हा पुढचाच प्रश्न आहे. त्या स्वार्थी मामानें ऐनवेळीं लग्नांतच विघ्न उपस्थित केलें नाहीं म्हणजे मिळविली. "

" विघ्न कसलें होणार उपस्थित ? देण्याघेण्याची बाजू नाहीं. तेव्हां भांडणाचें मूळच खुंटलें. "

" तुझा सुधारकपणा लग्नांत त्यांनीं चालू दिला नाहीं, कीं डोक्याला बाशिंग बांधण्याऐवजीं डोक्यांत राख घालायला लागशील तूं ! "

" तूं समजतोस तितके जुन्या चालीचे नाहींत हं मामासाहेब ! सकेशा गीताबाईच घरांत करतात ना सारें !"

" गीताबाईंचे डोळे पाहिलेस का तूं ? "

" मुलुखाचा चावट आहेस कीं रे ! "

" डोळ्यांवरून स्वभाव कळतो, ह्या तत्त्वावरला विश्वास इतक्यांत उडाला का ? बाकी माझ्यासारख्यानें आतां बडबडून काय उपयोग म्हणा ! तीर तर तुझ्या हातांतून निघून गेला आहे. वहिनीच्या डोळ्यांतील पाण्यांत तुझा सुधारकी बाणा वाहून गेला नाहीं म्हणजे जिंकलें ! "

* * * *

लग्नाला एकच आठवडा होता खरा; परंतु या अल्पकाळांत यशवंतानें मालिनीचा फोटो हजारवेळां तरी पाहिला असेल. प्रत्यक्ष पाहतांना तिनें एकदांच मान वर करून त्याच्याकडे पाहिलें होतें. पण वीज एकदांच चमकून गेली तरी तें दृश्य जसें डोळ्यांपुढून हलत नाहीं, त्याप्रमाणें मालिनीच्या तेजस्वी व प्रेमळ दृष्टीची यशवंताला विस्मृति झाली नाहीं. फुलापेक्षां कळी व सहवासापेक्षां उत्कंठा अधिक आकर्षक असते. त्या फोटोकडे पाहतांना यशवंत मनोराज्यांत इतका गर्क होऊन जाई कीं, त्याला हातांतील कामाचीहि शुद्धि राहत नसे. भविष्यकाळांतील अनेक सुखदायक चित्रें त्याच्यापुढें नाचूं लागत. समाजसेवेच्या आपल्या महत्त्वाकांक्षा पत्नीच्या साहाय्यानें सफल होऊन आनंदानें गात असलेल्या त्याला ऐकूं येऊं लागत. पहिला पाऊस पडतांच सारी पृथ्वी जशी हिरवीगार होते त्याप्रमाणें हृदयदेवतेच्या पहिल्याच दर्शनानें त्याचें प्रेमपिपासु मन आनंदानें फुलवून टाकलें होतें. बागेंत फुललेला गुलाब पाहिला कीं, ' फुलण्याची का रे घाई केलीस ? आणखी आठ दिवसांनीं फुलला असतास तर तुला मालिनीच्या डोक्यावर बसायला मिळालें असतें ' अशी त्याची थट्टा करण्याची इच्छा त्याला होई. माडीवरच्या खिडकींतून आंत येऊन उषा आपल्या आरक्त करांनीं त्याला उठवूं लागलीं कीं, जणुं काय मालिनीच आपल्याला जागें करीत आहे असा त्याला भास होई. आजपर्यंत ज्या प्रेमकविता केवळ त्याच्या कल्पनेला रिझवीत असत, त्याच आतां त्याचें अंतःकरण उचंबळवून टाकूं लागल्या. नवा जन्म घेतांना मनुष्य मागील जन्मांच्या आठवणी जशा विसरून जातो, त्याचप्रमाणें यशवंत मागील सुखदुःखें, आशानिराशा किंबहुना मित्रशत्रु या सर्वांच्या बाबतींत उदासीन बनला.

मुहूर्ताच्या आधीं दोन दिवस यशवंत, सदानंद व आपलें मित्रमंडळ यांच्यासह मामासाहेबांच्या गांवीं दाखल झाला. मामासाहेबांनीं जानोशाला दिलेली जागा

पाहतांच 'कावळ्याचें घरटेंच दिसतें आहे हें' असे मित्रमंडळीपैकीं एकानें उद्गार काढले! पण यशवंतानें तिकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. वरपक्षानें वधूपक्षाला अकारण त्रास देण्याची रूढि त्याला साफ मोडायची होती. सुधारणेच्या देवीपुढें हुंडा, मानपान, कलह वगैरे भुतें क्षणभरदेखील उभी राहूं शकत नाहींत, हें त्याला सिद्ध करायचें होतें. त्यामुळें त्यानें सर्व गैरसोईकडे काणाडोळा केला.

संध्याकाळ झाली होती तरी मित्रमंडळी नदींत मनसोक्त पोहून आली. भैरवेश्वराच्या मागील बाजूला असलेला डोह त्या सर्वांनाच फार पसंत पडला. डोहाच्या कांठीं गर्द झाडी असून जवळच निशिगंध, गुलाब वगैरे फुलझाडें मुद्दाम लावलेलीं दिसत होतीं.

"पोहायला जागा असावी तर अशी?" वगैरे वाक्यांनीं डोहाच्या स्तुतीला प्रारंभ झाला. या स्तुतीचें भरतवाक्य कॉलेजच्या त्रैमासिकांत चार ओळींची एक कविता नुक्तीच छापून आलेल्या एका होतकरू कवीनें केलें. त्याची स्फूर्ति उद्गारली, 'मरण यावें तर अशा जागीं.' तत्काळ "अहो कविराज, शुभ बोलरे नाऱ्याचे सख्खे भाऊच दिसता कीं! लग्नाला येऊन मरणाच्या गोष्टी कसल्या बोलतां?" वगैरे तोफांचा त्यांच्यावर भडिमार झाला. कवीचें कल्पनाकुसुम दारूगोळ्यांत होरपळून गेलें.

खेडेगांवांत व्याख्यात्याप्रमाणें आचारीहि दुर्मिळ असतो, हें लक्षांत घेऊन जेवणाची स्वतंत्र व्यवस्था न केल्याबद्दल यशवंत मामासाहेबांवर रागावला नाहीं. सर्व मंडळी वधूपक्षाच्या बिऱ्हाडींच जेवायला गेलीं. पानें वाढून होईपर्यंत त्यांनीं घर पाहून घेतलें. यशवंतहि त्यांच्याबरोबर होताच. मामासाहेबांनीं मंडळीला शेवटीं आपली माडी दाखविली. 'ही आमची माडी बरं.' घरांतला धांगडधिंगा सगळा खालीं. वर माडीवर चिट्पाखरूं देखील फिरकायचें नाहीं. त्यामुळें वाचन कसें निवांत चालतें. तें पहा टेबलावर गीतारहस्य उघडेंच पडलें आहे. सदानंदानें गीतारहस्य पाहिलें, त्याचवेळीं खोलींतील शृंगारदर्शक तसबिरी, नक्षीदार पलंग वगैरे गोष्टींकडेहि त्याचें लक्ष गेलें.

"तुम्हांला 'गीतारहस्य' वाचायला पाहिजे तर घ्या" मामासाहेब म्हणाले.

"छे, छे! यावेळीं पोटांत कावळे ओरडत आहेत त्यांचें म्हणणें ऐकलें पाहिजे. कृष्णाचा उपदेश मग सावकाश ऐकतां येईल! जिना उतरतां उतरतां सदानंद यशवंताच्या कानाशीं लागून म्हणाला, 'गीता-रहस्य—'

सदानंद यशवंतापाशींच जेवावयाला बसला. चार समवयस्क मित्रमंडळी जेवायला बसली कीं, थट्टामस्करीला भरती येतेच. त्यांतून हें तर लग्नापूर्वीचें जेवण. मग लहानसहान गोष्टींचा रोंखहि यशवंताच्या उत्कंठित मनःस्थितीवर वळावा यांत मुळींच नवल नव्हतें. यशवंताच्या हातून पिळतां पिळतां लिंबाचा तुकडा उडाला व आमटींत जाऊन पडला. ही संधि सदानंद थोडाच सोडतो ?

" अहो, आधुनिक अर्जुन, उगीच आमटींत लिंबू कां पिळतां ? वहिनी कांहीं वाढायला आल्या नाहींत बरें ! " त्यानें फेर सोडली. प्रवास, परीक्षा, लग्न वगैरे प्रसंगीं उत्कंठित मनःस्थितींत जेवण जात नाहीं. हा प्रत्येकाचा अनुभव आहेच. यशवंत फारसें जेवीत नाहीं हें पाहून दुसरे मित्र उद्गारले, वहिनीचा हात लागल्या-खेरीज घांस खालीं उतरणार नाहीं म्हणतो कीं काय ? पण संभाळ रे बाबा ! दोन दिवस उपास घडतील हं अशानें ! "

दुसऱ्यानें मल्लिनाथी केली. " रामानें जशी यज्ञाकरितां सीतेची पुतळी केली, तशी यशवंत उपाशीं 'राहूं नये म्हणून वहिनींची पुतळी ठेवावी त्याच्याजवळ ! "

तिसऱ्यानें आपलें घोडें पुढें दामटलें, " पुतळी हवी कशाला ? कॉलेजांत सदानंदानें स्त्रियांची भूमिका काय कमी वेळां केली आहे ? होऊं या त्यालाच घटका-भर वहिनी ! "

या वात्रटपणाच्या वाऱ्यामुळें सदानंदाचा विनोदवन्हीहि प्रज्वलित झाला. " पण माझा घांस चालेल का यशवंताला ? कांहीं झालें तरी मी सारस्वत ! तो कऱ्हाडा ब्राह्मण ! "

सदानंदाच्या या वाक्यानें मित्रमंडळांत एकच हंशा पिकला. पण त्याच वेळीं शास्त्रीबोवा व इतर भिक्षुक बसलेल्या कोंपऱ्यांत कुजबूज सुरू झाली.

मित्रपरिवार आपल्या बिऱ्हाडीं जाऊन थट्टामस्करीबरोबर निद्रेची आराधना करूं लागला. यशवंतहि मालिनीच्या डोळ्यांच्या चिंतनांत गुंग होऊन गेला. लग्नविधि म्हणजे शुद्ध लपंडाव आहे असें त्याला वाटूं लागलें. जे दोन जीव दोन दिवसांत एकजीव होणार त्यांना एकमेकांपासून दूर ठेवण्याचा रूढीचा केवढा अट्टाहास ! मालिनी वाढायला आली नाहीं एवढेंच नव्हे तर पंक्तीकडे फिरकलीहि नाहीं. मुहूर्तोची घटका भरली तरी वधूवरांमध्यें अंतःपट धरून त्यांना एकमेकांपासून दूर ठेवण्याची धडपड चाललेलीच असते. या उथळ परंतु गुदगुल्या करणाऱ्या विचारांच्या झोंपा-ळ्यावर तो स्वच्छंद झोंके घेत असतांना मामासाहेब व शास्त्रीबोवा यांच्या स्वाऱ्या

तेथें दाखल झाल्या. बहुधा अंथरूण पांघरुणाची चौकशी करण्याकरितां ही मंडळी आली असतील, आपल्या गैरसोई सांगून त्यांना अधिक त्रास द्यायचा नाहीं असा निश्चय यशवंत मनांत करतो न करतो तोंच मामासाहेब म्हणाले, " यशवंतराव, आपल्याकडे माझें एक नाजुक काम आहे."

" लग्न म्हणजे नाजुक कामांचें आगर ! " सदानंद शेजारच्या मित्राला डंवचून म्हणाला.

" काय काम असेल तें खुशाल सांगा ! "

" जरा एकांत—"

" एकांत कशाला हवा ? या साऱ्या मित्रांपासून उभ्या जन्मांत मीं कांहीं चोरलें नाहीं. काय बोलायचें असेल तें खुशाल बोला."

" तुम्हाला उद्यां प्रायश्चित्त घेतलें पाहिजे."

" प्रायश्चित्त ? देहांत कीं साधेंच ? "

" असें थट्टेवारी नेऊं नका."

" पण प्रायश्चित्त घेण्यासारखें माझ्या हातून पाप काय घडलें आहे ? "

" पाप ! महत्पाप घडलें आहे ! " शास्त्रीबोवांना वाचा फुटली. सदानंदाकडे बोट करून ते म्हणाले, " या सारस्वतांच्या पंक्तीला तुम्ही आज बसलांत ना ? "

" आजच बसलोंय् थोडा ! वर्षानुवर्षे बसत आलों आहें ! "

" उद्यां याबद्दल आपण प्रायश्चित्त घेतलें नाहीं तर येथील भिक्षुक मंडळी लग्न चालवायला तयार नाहींत." मामा म्हणाले.

" इथलेच काय पण साऱ्या जगांतले नसले तरी चालतील. १८७२ चा कायदा तर जिवंत आहेना ? "

" आपण सतराशें साठ कायदे काढाल व उद्यां येथून निघून जाल ! मला याच गांवांत सारा जन्म काढायचा आहे."

" तुमचा जन्म सुखानें जावा म्हणून मी जन्माचा कलंक लावून घेऊं कीं काय ? "

" 'प्रायश्चित्तेन शुध्यति' असें शास्त्रवचन आहे ना ? " शास्त्रीबोवांनीं मध्यस्थी केली.

" शास्त्रीबोवा, तीं शास्त्रवचनें घोकीत तुम्ही खुशाल बसा." यशवंत रागानें लाल होऊन म्हणाला. त्याचे ओंठ थरथर कांपत होते. " मामासाहेब, मी सुधारकी मतांचा आहे हें मी तुम्हाला आधींच बजावलें होतें ना ? सारस्वतासारख्या समान

जातीच्या काय पण महारासारख्या हीन मानलेल्या जातीच्या पंक्तीला बसल्याबद्दल देखील मी प्रायश्चित्त घ्यायला तयार नाहीं."

"पण खेडेगांव म्हटलें कीं, तिथें जुन्या चाली पाळाव्या लागतात."

"तुम्ही सकेशा गीताबाईंच्या हातचें जेवतां ही जुनीच चाल ना?"

शेपटीवर पाय पडलेला साप जसा दंश करण्याकरितां उलटतो त्याप्रमाणें मामासाहेब उसळून म्हणाले, "खबरदार यशवंतराव अधिक बोलाल तर! वाहवारे सुधारक? सकेशा खपत नाहीं आणि परजातीच्या पंक्तीला मात्र जेवायला पाहिजे. प्रायश्चित्त घेणार असाल तरच लग्न होईल. असला उर्मट जांवई हवा तरी कोणाला? माझ्या भाचीला काय एक सोडून छप्पन्न स्थळें मिळतील."

हें अपमानकारक भाषण यशवंताला असह्य झालें. राग आवरण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करून तो म्हणाला, "या छप्पन स्थळांत यशवंत कोटिभास्कर नाहीं हें मात्र लक्षांत ठेवा." मनांतलें तुफान बाहेर दिसूं नये म्हणून तो लगेच सर्व मंडळीकडे पाठ करून बसला. भांडण विकोपाला गेलेलें पाहून सदानंद शांतपणानें म्हणाला, "मामासाहेब, शास्त्रीबोवा, खेडेगांव म्हटलें म्हणजे तिथें जुन्या चालीप्रमाणेंच वागलें पाहिजे हें आम्हांला कबूल आहे."

"बरोबर बोललांत सदानंदराव. याला म्हणतात समंजसपणा!" मामांनीं शाबासकी दिली.

"धर्मप्रेम असावें तर असें!" शास्त्रीबोवांनीं स्तुतिवर्षाव केला.

"सदानंद, लग्न माझें व्हायचें आहे, तुझें नाहीं हें लक्षांत ठेवून बोल." यशवंत संतापानें कडकडला.

"अरे होय रे बाबा, लग्न तुझेंच व्हायचंय्. मी दुसरें लग्न करायला एका पायावर तयार होईन! पण माझ्यासारख्या सारस्वताला मामासाहेब आपली भाची थोडीच देणार आहेत?"

"सदानंदराव, तुम्हीच काय ती तडजोड करा." मामा मुत्सद्द्याला अनुरूप अशा मृदु स्वरांत म्हणाले.

"तडजोड सोपी आहे. हें खेडेगांव आहे व इथें यशवंतानें काय अगर तुम्ही काय जुन्या चालीप्रमाणेंच वागलें पाहिजे. माझ्या पंक्तीला बसल्याबद्दल प्रायश्चित्त घेणें हें यशवंताचें कर्तव्यच आहे."

" अगदीं रामशास्त्र्यांचा न्याय ! " शास्त्रीबुवांनीं शेरा दिला.

" धारवाडी कांटा ! " मामांनीं शेलापागोटें अर्पण केलें.

यशवंत चडफडूं लागला. सदानंद पुढें म्हणाला, " प्रायश्चित्त घेऊन जुन्या चालीप्रमाणें वागणें हें जसें यशवंताचें कर्तव्य आहे, त्याप्रमाणें, मामासाहेब, हुंडा देणें, पत्रिका दाखविणें हीं जुन्या चालीप्रमाणें तुमचींहि कर्तव्यें आहेत. यशवंताला ते सावकार तीन हजार हुंडा देत होते. त्याच्या घरचें उत्पन्न आहेच तेवढें म्हणा. तुम्ही आमचे म्हणून दोन हजार द्या. मग तर झालें ! शिवाय आतांच्या आतां मुलीची पत्रिका आणून द्या. म्हणजे तिला मंगळ बिंगळ आहे कीं काय हें आम्हांला पाहतां येईल. पत्रिका तत्काळ आली पाहिजे. उद्यां सकाळीं हुंड्याची रक्कम हातांत पडली, कीं यशवंत प्रायश्चित्त घ्यायला बसलाच म्हणून समजा."

" देवानें जीभ दिली आहे म्हणून टाळ्याला लावतां झालं ! लग्न ठरलें त्यावेळीं यांतली एकहि अट यशवंतरावांनीं घातली नव्हती."

" नि तुम्हीं तरी प्रायश्चित्त घेण्याची घातली होती वाटतें ? माझीं सुधारकी मतें मान्य आहेत असेंच तुम्ही म्हणालां होतां ना ? " यशवंत म्हणाला.

" तो वितंडवाद हवा कशाला आतां ? तुम्ही प्रायश्चित्त घेणार कीं नाहीं ? "

ठकाशीं ठक झालें पाहिजे हें सदानंदाच्या बोलण्यामुळें यशवंताच्या ध्यानांत आलें होतें. नेहमींचा भाबडेपणा टाकून त्यानें उत्तर दिलें, " सदानंदाच्या आतांच्या अटी तुम्हांला मान्य असतील तर घेईन. अर्ध्या तासांत पत्रिका इथें आली पाहिजे, नि उजाडतांच हुंड्याची रक्कम पटली पाहिजे. "

" वाहवारे सुधारक ! " म्हणून यशवंताला वेडावीत वधूपक्षाकडील दुक्कल निघून गेली.

* * * *

यशवंताच्या डोक्यांत नुसता आगीचा डोंब उसळला होता. अर्ध्या तासांत पत्रिका आणून दाखविण्याइतकें मामांनीं नमतें घेतलें तर हुंड्याची अट परत घ्यायची असें त्यानें मनाशीं ठरविलें होतें. हुंडा, पत्रिका वगैरे स्वतःला फायदेशीर असणाऱ्या बाबतींत आपल्या सुधारकी मतांना मान्यता देणाऱ्या मंडळींनीं सारस्वताच्यापंक्तिला बसण्याच्या यःकश्चित् प्रश्नावर एवढें रण माजवावें याचें त्याला राहून राहून आश्चर्य वाटत होतें. प्रायश्चित्त घेण्याच्या प्रश्नापेक्षां तो ज्या उद्धटपणानें त्याच्यापुढें मांड-

ण्यांत आला होता त्याचीच त्याला चीड आली होती. तत्त्वाकरतां त्यानें हुंड्यावर पाणी सोडलें होतें. हुंडा न घेण्यानें वधूपक्षावर आपण उपकार करीत आहोंत अशी स्पष्ट भावना जरी त्याच्या अंतःकरणांत उद्भवली नव्हती, तरी त्या मंडळींनीं आपल्याशीं चांगलें वागावें असेंच आपण त्यांना वागविलें आहे, ही कल्पना मात्र स्पष्ट होती. क्षुद्र मानापमानाचे प्रश्न त्यानें खिजगणतींत देखील घेतले नसते ! पण " माझ्या भाचीला एक सोडून छपन्न स्थळें मिळतील " या मामांच्या वाक्यानें मात्र त्याच्या स्वाभिमानाला डंवचून जिव्हारीं वार केला होता. दुखावलेला स्वाभिमान ' कांहीं झालें तरी लग्न मोड ' असें त्याच्या कानींकपाळीं ओरडत होता.

इतक्यांत मालिनीची मधुर डोळ्यांची मूर्ति त्याच्यापुढें उभी राहिली. खून चढलेल्या मनुष्याच्या पुढें त्याचें आवडतें मूल उभें राहावें त्याप्रमाणें यशवंताची स्थिति झाली. आपण लग्न मोडलें तर मालिनीची स्थिति अधिकच बिकट होईल या विचारानें त्याचें मन बेचैन झालें. तिची प्रेमळ मूर्ति यशवंताला विचारूं लागली " काय बरं करूं मी ? आपला अपमान होऊं नये अशी माझी किती किती इच्छा होती. मामांच्या बोलण्यासाठीं मला लाथाडून देणें म्हणजे चोर सोडून संन्याशाला सुळीं देण्यासारखें नाहीं कां ? मुलीच्या जातीला तोंड नसलें म्हणून मन नसतें का ? हजारों रुपये हुंड्यावर लाथ मारण्याइतकें आपलें मन उदार आहे. निष्ठुर मामांच्या चुकीसाठीं भाचीला जन्माची शिक्षा करणें आपल्याला शोभतं कां ? " हे शब्द त्या मूर्तीच्या तोंडून निघतात न निघतात तोंच तिच्या डोळ्यांतून गंगायमुना वाहूं लागल्या. आपल्या गालावर त्यांतले कांहीं थेंब पडले असें वाटून यशवंतानें गालाकडे हात नेला तो स्वतःच्याच डोळ्यांतून अश्रू वाहत आहेत असें त्याला आढळून आलें.

अभिमानानें अंध झालेल्या त्याच्या मनाला नवीन दृष्टि प्राप्त झाली. मामांवर चिडून हें लग्न मोडणें म्हणजे दंश धरणाऱ्या नागाचें अनुकरण करण्यासारखें आहे हें त्याला पटूं लागलें. नागाला खडा मारला तर मारणाराचा दावा न धरतां त्याच वेळीं ज्याचा शब्द कानावर पडतो त्याचा तो पाठलाग करतो अशी समजूत आहे. ' मामांच्या उद्दामपणासाठीं मालिनीच्या जन्माचें नुकसान करणें असेंच नाहीं कां ? ' हा प्रश्न त्याची सदसद्विवेकबुद्धि त्याला विचारूं लागली. सुधारणेचा अभिमान बाळगणाऱ्या मनुष्यानें इतर लोकांप्रमाणें क्षणाच्या अभिमानासाठीं जन्माची चूक करतां कामा नये असें त्यानें ठरविलें. मूर्खांच्या राज्यांत शहाण्यालाहि मूर्ख व्हावें लागतें हें ध्यानांत आणून, आपण प्रायश्चित्त घ्यायला तयार आहोंत असें मामांना सांगून

येण्याकरितां तो अंथरुणावरून उठला! खिशांत बॅटरी आहे कीं नाहीं हें त्यानें पाहिलें. निजलेल्या मित्रांपैकीं कुणीहि जागा झाल्यास आपल्या सद्विचाराला मोडा घालील म्हणून तो चोरट्या पावलीं बाहेर आला.

मामासाहेबांच्या वाड्यापुढील मंडपांत दिवा जळत होता. दारावर एक गडी डुलक्या घेत बसला होता. लग्नाच्या धांदलीमुळें गडी दारांतच झोंपत असे व दार बारा बारा वाजेपर्यंत उघडें राहत असे. गड्यालादेखील आपली चाहूल न लागूं देतां यशवंत हळूच सोप्यावर गेला व तेथून सावकाश माडी चढूं लागला. चार पांयऱ्या चढल्यानंतर आपण हा भलता दुबळेपणा दाखवीत आहों, सदानंदाला विचारून काय तें पक्कें ठरवावें, असा विचार मनांत येऊन तो थबकला. पण दुसऱ्याच क्षणीं मालिनीचे मधुर डोळे पुढें येऊन त्याची निर्भर्त्सना करूं लागले. लग्न आतां मोडणार या भीतीनें स्फुंदत ती याच घरांत कुठें तरी बसली असेल या कल्पनेनें त्याचें मागें पडणारें पाऊल पुढें ढकललें. पायऱ्या चढून जाऊन त्यानें मामांच्या माडीचें दार हळूच ढकललें.

"उघड तूं. कडी नाहीं आंतून." मामांचा आवाज ऐकूं आला. यशवंताची छाती धडधडूं लागली. घसा कोरडा पडल्यासारखें त्याला वाटूं लागलें. त्यानें कसें-बसें दार उघडलें. "मुद्दामच दिवा मालवून टाकला. लग्नाच्या निमित्तानें घरांत माणसें वावरत असणार. ये ना इकडे अशी. लांब कां उभी तूं" हे शब्द ऐकतांच यशवंताच्या अंगावर कांटा उभा राहिला. चट्कन परतून जावें असें त्याला वाटलें. पण इतक्यांत मामासाहेब पलंगावरून उठून बोलूं लागले. "त्या मूर्ख यशवंताचें कडू बोलणें खूब ऐकलें आज. तुझा एक गोडसा घेतल्याशिवाय बरें वाटणार नाहीं. लेकाचा पत्रिका मागत होता! मंगळाची पत्रिका दाखविण्याइतका मी वेडा नाहीं म्हणावें. कां—अजूनहि कां बोलत नाहींस? द्वापारयुगीं देवानें अर्जुनाला गीता नुसती सांगितली! पण या कलियुगांत ती मला दिली असें मी म्हणतों तें खोटेंच वाटतें? कळलें हं अबोल्याचें कारण. राणी-साहेबांना हाताला धरून त्यांना पलंगाच्या सिंहासनावर नेऊन बसवायला पाहिजे." बोलणें थांबलें व मामा दरवाज्याच्या रोखानें येत आहेत असें यशवंताला वाटलें. ते अगदीं जवळ आल्यासारखे वाटतांच यशवंतानें एकदम बॅटरीची कळ दाबली. यशवंताला समोर पाहतांच मामासाहेबांच्या रंगाचा भंग होऊन गेला! त्याला शिव्या देण्याचें देखील भान त्यांना राहिलें नाहीं. त्यांच्याकडे तुच्छतादर्शक दृष्टीनें पाहून

यशवंत जिन्याकडे वळला. पहातो तों गीताबाई अंधेरांतच जिना चढून वर येत आहेत.

यशवंताच्या मनांत पुन्हां विचारांचें वादळ सुरू झालें. विधवेशीं निंद्य संबंध ठेवणाऱ्या मनुष्यानें परजातीच्या मनुष्याच्या पंक्तीला जेवायला बसल्याबद्दल प्रायश्चित्त घेण्याचा उपदेश करावा ! खासा न्याय ! शेणानें आंबट म्हणून श्रीखंडाची निंदा करावी अगर मिरच्यांच्या पुडीनें कस्तुरीला काळी म्हणून हिणवावें अशांतला हा प्रकार! धर्माच्या गप्पा मारणाऱ्या शास्त्रीबोवाला मामांचें हें कृष्णकृत्य माहीत नसेल काय ? नसायला काय झालें ? पण रूढीच्या राज्यांत जाईल तिथें हत्ती जातो नाहीं तर सुईचें टोंकहि जात नाहीं. प्रायश्चित्त घेतल्याखेरीज मला जर मालिनीचें पाणिग्रहण करतां येणार नाहीं तर दहावीस वर्षे सक्तमजुरी करायला लावल्याशिवाय या मामाला तरी कन्यादानाचा अधिकार समाजानें कां द्यावा ? तें कांहीं नाहीं. पापाच्या चिखलांत आकंठ बुडून दुसऱ्याच्या अंगावर शिंतोडे उडविणाऱ्या ढोंगी लोकांना शिक्षा झालीच पाहिजे. मंगळ लपविण्याकरितां पत्रिका बघायला नको म्हणणारे हे कपटी लोक धर्म कसला पाळणार ?

विचारांची गाडी इथपर्यंत येतांच मालिनीचे डोळे यशवंतापुढें उभे राहिले. त्यांच्यांतील अश्रू जणुं काय त्याला म्हणत होते ‘ आपल्याला भाजून टाकणारी अपमानाची आग आम्ही विझवून टाकूं. ती शांत करण्याला आमची धनीण आपलें रक्तदेखील देईल. पण तिचा धिक्कार मात्र करूं नका. ’

निरपराधी मालिनीला वांचवायचें तर मामासारख्या कसाबापुढें आपल्या अभिमानाला बळी दिलें पाहिजे हें यशवंताला स्पष्ट दिसत होतें.

‘ त्याग हाच खऱ्या सुधारणेचा आत्मा आहे ’ हें त्यानेंच अनेक व्याख्यानांत प्रतिपादन केलेलें तत्त्व त्याच्या कानांत घुमूं लागलें. सुंदर चांदण्यांत निशिगंधाच्या सुवासानें दरवळलेल्या वातावरणांत नदीचें थंड पाणी डोक्यावर शिंपडून बसल्या-खेरीज आपल्याला शांतपणानें विचार करतां येणार नाहीं, असें वाटून बिऱ्हाडीं न जातां त्यानें नदीची वाट धरली.

भैरवेश्वराच्या देवळाला वळसा घालतांच डोहाकांठच्या खडकावर कुणीतरी माणूस उभें आहे असा त्याला भास झाला. यशवंत कट्टा सुधारक खरा पण भूत-

पिशाच्याची कल्पना त्याच्या मनांत आल्यावांचून राहिली नाहीं. तो डोळे फाडफाडून पाहूं लागला. खडकावरील त्या व्यक्तीनें आकाशाकडे डोळे लावून हात जोडले व दुसऱ्याच क्षणीं ‘ जय गंगे ’ म्हणून डोहांत उडी टाकली. ‘ जय गंगे ’ हा शब्द कानांवर पडतांच यशवंत तिरासारखा डोहाकडे धांवत सुटला. पहिल्या उडीमुळें पाण्यावर उठलेलीं वर्तुळें अस्पष्ट झालीं न झालीं तोंच त्यांत दुसरी उडी पडली. आकाशांतून लागोपाठ तुटून पडणाऱ्या दोन तारकांप्रमाणें त्या उड्या होत्या. थोड्याच वेळांत यशवंत त्या व्यक्तीला पाण्याबाहेर काढून पोहत कांठावर आला. ती मुलगी होती हें त्यानें पाण्यांतच ओळखलें होतें ! पाण्यांत तिचे केंसच प्रथमतः त्याच्या हाताला लागले होते. त्या अर्धमूर्च्छित मुलीचा चेहरा त्यानें हातानें वर केला. स्वप्नांत असल्याप्रमाणें तिनें डोळे उघडून पाहिलें, तेच प्रेमळ डोळे ! यशवंताच्या हृदयाचें पाणी पाणी झालें. निशिगंधाचा मधुर सुवास सभोंवतालीं पसरला होता; पण मालिनीच्या स्पर्शांत त्या सुवासापेक्षांहि अधिक मोहकता होती. तिची मान आपल्या खांद्यावर सांवरीत यशवंत म्हणाला, “ मालिनी, मालू, कां, बरं, असं भलतंच साहस केलंस ? ”

“ लग्न मोडलं म्हणून. कुठें ठरत नव्हतं तें एकदांचं ठरलं; पण मामांनी नुसतं कुसपट काढून बिब्बा घातला मधें. गीताबाईंनी तर मघांशीं मला बोलबोलून घेतलें. ‘ तुझा पायगुणच वाईट. तुझें वाशिंगबळच खडतर ! ’ एक नि दोन ! ‘ जीव तरी दे. आईबापांना लहानपणींच मारून बसलीस नि–’ मालिनीच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. थंडीनें कुडकुडणाऱ्या तिच्या अंगावर हात फिरवीत यशवंत म्हणाला, “ हें लग्न मोडलं असतं तर दुसरं झालं असतं.”

एखाद्या पोराप्रमाणें त्याच्या कुशींत आपलें डोकें लपवीत मालिनी म्हणाली, ‘ बिनहुंड्यानं मला कोण करून घेणार होतं ? शिवाय फार दिवस ज्याची वाट पहात होतें तें माणूस भेटल्यावर–’ पुढें कांहींच न बोलतां ती कुशींत अधिकाधिक डोकें खुपसूं लागली. तिच्या शेवटच्या वाक्यानें यशवंताच्या उत्कंठित हृदयांत एक अननुभूत मुग्धमधुर भावना उचंबळून आली. आपण काय करतों आहों याचें भान न राहून त्यानें तिचें मुख वर केलें. आतां तो चुंबन घेणार तोंच कुणीसें म्हटलें, “ छान सुधारणा चालविली आहे बरं यशवंतराव ! ” यशवंत मागें वळून पाहतो तों मालिनीला शोधण्याकरितां दोन गडी घेऊन आलेले मामा !

* * * *

यशवंताला शोधण्याकरितां मामा गीताबाईसह खालीं आले तेव्हां मालिनी घरांत कुठें दिसली नाहीं. गीताबाईच्या मनांत आपलें बोलणें खवखवत होतेंच. तिच्याच सांगण्यावरून मामा गडी घेऊन डोहाकडे गेले होते.

*   *   *   *

कन्यादानाच्या वेळीं मामा यशवंताला म्हणाले, "प्रायश्चित्त घेतलेंत म्हणून हें दान मिळत आहे हं."

"पण हें प्रायश्चित्त आहे दुसऱ्याच्याच पापाबद्दल!" सदानंद डोळे मिचकावीत म्हणाला. "होय कीं नाहीं मामासाहेब? बाकी गीतारहस्यापुढें तुमचें लक्ष अशा गोष्टींकडे जातंय कशाला म्हणा?" घाव वर्मी लागला असें पाहतांच सदानंद यशवंतापाशीं जाऊन हळूच म्हणाला, "बघ कसे झालेत गुलामाचे डोळे ते."

यशवंतानें हे शब्द ऐकले, पण मालिनीच्या सलज्ज दृष्टीवरील त्याची नजर ढळविण्याचें सामर्थ्य त्या शब्दांत नव्हतें.

१९२९

# अभ्यास

## आई ! आई ! !

( १ ) तुमच्या अनुभवांतली आईच्या विलक्षण प्रेमाची एखादी गोष्ट सांगा.

( २ ) 'केवढें हें क्रौर्य' ही टिळकांची कविता आणि 'पण लक्षांत कोण घेतो' यांतील आईच्या मृत्यूचें प्रकरण वाचा.

( ३ ) 'उपवर मुलीची आई गरीब असून भागत नाहीं!' हें कुसुमावतीचें म्हणणें तुम्हांला पटतें काय ?

## सवतीचा सूड

( १ ) या गोष्टीचें नांव तुम्हांला योग्य वाटतें कां ? वाटत असल्यास कारण सांगा; नसल्यास तुम्हीं दुसरें कोणतें नांव सुचवाल ?

( २ ) सवत म्हटली कीं तिथें मत्सर आलाच अशी समजूत आहे. पण या गोष्टींत लेखकानें निराळेंच चित्र रंगविलें आहे. हा चमत्कार त्यानें कसा घडवून आणला याचें विवेचन करा.

( ३ ) हुंड्यापायीं स्वतःला जाळून घेणाऱ्या स्नेहलतेची माहिती मिळवून आत्म-हत्येपूर्वीचे तिच्या मनांतले विचार पत्ररूपानें लिहा.

## दृष्टिलाभ

( १ ) 'आई, आई ! !' व सवतीचा सूड' या गोष्टींच्या कथानकांशीं या गोष्टीच्या कथानकाची तुलना करून तुम्हांला महत्त्वाचा कोणता फरक दिसतो तें सांगा.

( २ ) अहो ! वेदांत, भारत, भागवत, सारं सोडून तुतारी कुठली सुचली हो या बेट्याला ?' हा प्रश्न वाचून आपल्याला हंसूं का येतें !

( ३ ) केशवसुतांची 'रांगोळी घालतांना पाहून' ही कविता व 'दृष्टीआडच्या सृष्टींत' हीं शब्दचित्रें ( लेखिका—श्यामा ) वाचा.

## चतुर्भुज

( १ ) या गोष्टीला 'समजुतीचा घोटाळा' अथवा 'ब्रह्मघोटाळा' असें नांव दिलें तर तें अधिक चांगलें दिसेल काय ?

( २ ) 'कपड्यांची अदलाबदल' ही श्री. केळकरांची गोष्ट व 'निशिकांतची नवरी' हें श्री. काणेकरांचें नाटक वाचा.

( ३ ) व्यक्तिविषयींची गैरसमजूत अगर वस्तूंची अदलाबदल यामुळें उत्पन्न झालेला तुमच्या अनुभवांतला एखादा विनोदी प्रसंग वर्णन करा.

## माहेरचीं भुतें

( १ ) अरुणचें मन कलाकाराचें होतें हें दिग्दर्शित करण्याकरितां लेखकानें कोणकोणते प्रसंग योजिले आहेत ?

( २ ) ' माहेरचीं भुतं तीं ! जन्मभर पिच्छा सोडायचीं नाहींत ! ' या अरुणच्या उद्गारांचा अर्थ काय ?

( ३ ) या गोष्टींत अत्यंत शोकजनक अशी कुठलीही मोठी घटना नाहीं. मग ही गोष्ट वाचून संपवितांच आपलें मन अतिशय खिन्न कां होतें ?

## स्वराज्यभिक्षा

( १ ) या काल्पनिक गोष्टींत ऐतिहासिक वातावरण निर्माण करण्याकरितां लेखकानें कोणकोणत्या गोष्टींचा आश्रय केला आहे.

( २ ) हरिभाऊ आपटे यांच्या ' उषःकाल ' व ' गड आला पण सिंह गेला ' या कादंबऱ्या वाचा.

( ३ ) वीस ओळींत मंजुळेचें स्वभावचित्र लिहा.

## आंधळ्याची भाऊबीज

( १ ) ही गोष्ट प्रसिद्ध होतांच खांडेकरांची लोकप्रिय कथालेखकांत गणना होऊं लागली. त्या दृष्टीनें या कथेंतल्या गुणावगुणांची चर्चा करा.

( २ ) " माहेरचीं भुतें ' व ' आंधळ्याची भाऊबीज ' या गोष्टींत तुम्हांला कुठें साम्य आढळतें ? कां ?

( ३ ) गोष्टीच्या शेवटीं चंद्रशेखराच्या तोंडांत ' तुतारी'तल्या तीन ओळी घालण्यांत लेखकाचा काय उद्देश आहे ?

## लीलावती

( १ ) ' रहस्यानें कथेची रम्यता वाढते ' या तत्त्वाचा लेखकानें कसा उपयोग करून घेतला आहे तें सांगा.

( २ ) 'पुनर्विवाह' या विषयावर वीस ओळींचा निबंध लिहा.

( ३ ) ' जगांत दुसऱ्याला हंसण्याइतकें सोपें आणि दुसऱ्यासाठीं रडण्याइतकें कठिण काम नाहीं !' या वाक्याचें सविस्तर विवेचन करा.

## गीतारहस्य

( १ ) या गोष्टींतल्या मामांच्या स्वभावाचे विशेष सांगा.

( २ ) खेडेगांवांतल्या वातावरणाचा लेखकानें कथानकाच्या विकासाला. कसा उपयोग करून घेतला आहे तें पहा.

( ३ ) या कथेंतली तुम्हांला आवडलेलीं पांच वाक्यें लिहून तीं आवडण्याचीं कारणें सांगा.